


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

गोविंदा रामाहो, गोपाला रामा जी जी
श्रीकृष्ण सोंगाड्याचे आम्ही बाळ बागडे जी जी
आनंदे गाऊ नाचू परी पाहू त्याकडे जी जी
इंद्रिये गाई आमुच्या, जातातो चोहीकडे जी जी



# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष १३ : अंक १ : हिवाळा १९९५






अनुक्रमणिका

## अनुक्रम



मुखपृष्ट / पल्लवी बापट; वासुदेवाचे गाणे (जोशी पं. महादेवशास्त्री संपा., भारतीय संस्कृतिकोश, खंड आठ, पुणे, १९७४ वासुदेव ही नोंद)

---


**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन-समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७ (दूरध्वनी : ३५६०६१ / २४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे - ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरण पृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** कल्याण काळे **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी – मृणालिनी शहा
**मुद्रण स्थळ :** सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ, पुणे - २.

संपादकीय

# दुसरा डोळा केव्हा उघडणार ?

माणसामध्ये काही उपजत क्षमता वाढीच्या क्रमात ठराविक वेळात जागतात. उदाहरणार्थ, अंगावर पिणे, स्मित करणे, उपडे वळणे, वयात आल्यावर भिन्न लिंगी व्यक्तीबद्दल आकर्षण वाटणे. पण जीवनाचा सामना करण्यासाठी ही उपजत शिदोरी पुरेशी नसते. अस्फुट क्षमतेवर अनुभवाचे कलम होऊन क्षमतांच्या पुंजीत बदल होतो किंवा भर पडते. माणूस शिकतो-उदाहरणार्थ, धग लागल्यामुळे आगीपासून दूर राहायचे माहीत होणे. पण ही स्वार्जित ज्ञानाची पुंजीही पुरेशी होत नाही. माणूस दुसऱ्याच्या देखरेखीखाली शिकतो, म्हणजे दुसरा त्याला शिकवतो. उदाहरणार्थ खेळातल्या सोबत्यांकडून गोट्या खेळायला, शिव्या द्यायला, मारामारी करायला शिकणे, मोठ्या माणसांकडून खोटे बोलायला, शिष्टाचार पाळायला, चहा करायला शिकणे. उपजत ज्ञान व स्वार्जित ज्ञान यांच्या जोडीला उपार्जित ज्ञान येऊन मिळते.

माणसाच्या समाजात अशा रीतीने काही समाईक ज्ञानाची पुंजी तयार होते. तिला आपण म्हणतो संस्कृती. शिक्षणाच्या रूपाने मागच्या पिढीचे संचित पुढच्या पिढीपर्यंत पोचवले जाते. माणसाचे बरेच शिक्षण अनौपचारिक असते. स्वभाषाशिक्षणाचा बराचसा भाग याचे एक ठळक उदाहरण. पण प्रगत समाजाला शिक्षणाची शिवाय औपचारिक तरतूदही करायला लागते. शिक्षणाचा आशय त्या आशयाला अनुकूल असे अनुभवाचे माध्यम, शिकणाऱ्याची प्रेरणा आणि क्षमता आणि शिकवणाऱ्याची प्रेरणा आणि क्षमता असे शिक्षणाचे चार घटक. त्यांचा या औपचारिक शैक्षणिक तरतुदीमध्ये विचार करावा लागतो. उदाहरणार्थ, शिक्षणाचा आशय म्हणजे केवल तथ्य (फॅक्ट) किंवा नैपुण्य (स्किल) नव्हे, जोडीला अंतर्दृष्टी (इन्साइट - तथ्य कशाबद्दल, नैपुण्य कशासाठी) आणि अभिवृत्ती (ॲटिट्यूड उदाहणार्थ, कशाला लाजावे आणि कशाला लाजू नये) यांचीही गरज असते. अगदी मर्यादित उद्दिष्टासाठी प्रशिक्षण (ट्रेनिंग) द्यायचे असते तरीही. या आशयाच्या सर्व घटकांची, अंगांची गरज असते. शिक्षणाचे माध्यम म्हणजे केवळ भाषणबाजी किंवा उपदेश नाही. चर्चा, कार्यानुभव अवलोकन इत्यादी बरेच काही त्यात समाविष्ट असते.

पण प्रगत समाजाला केवळ औपचारिक शिक्षणाची तरतूद पुरेशी ठरत नाही. समाजातील माणसांचे स्वार्जित ज्ञान पुष्कळदा संचित ज्ञानातच मोडणारे असते. ( हा तुला आता शोध लागला होय, अरे सगळीच तसे करतात!) पण कधी कधी ते संचित ज्ञानाच्या पलीकडे जाणारे असते. अशा नव्या ज्ञानाची समाजात कदर व्हायला पाहिजे. ('मोठा शहाणा लागून गेलास' न म्हणता 'वा, आपण पण करून बघायला पाहिजे'), ते समाजाच्या संचितात म्हणजे संस्कृतीत जमा व्हायला पाहिजे. ('विज्ञानाची कमाल आहे' म्हणून न

थांबता विज्ञान संस्कृतीत जमा झाले पाहिजे), आणि त्याचा औपचारिक शिक्षणाच्या आशयात समावेश झाला म्हणजे ते पुढच्या पिढीपर्यंत पोचेल. (मध्ययुगीन चीनमध्ये बीजगणिताचा शोध लागला, पण त्याला फावल्या वेळेची करमणूक एवढीच किंमत मिळाल्यामुळे दोनएक पिढ्यात ते विसरलेही गेले). मग ते स्वार्जित ज्ञान संशोधन ठरते.

प्रगत समाजाचे शिक्षण आणि संशोधन हे दोन डोळे आहेत. उगीच नाही प्रगत औद्योगिक संस्थेत प्रशिक्षण विभाग आणि संशोधन विकास विभाग (आर-अँड-डी) असतात. पण नेहमीच असे होते असे नाही. आपले पूर्वज सर्वज्ञ होते, आपण त्यांच्यापुढे अज्ञ बालके आहोत अशी समाजात धारणा असली तर संशोधनाची आबाळ होते. ('पूर्वज' ऐवजी 'पाश्चात्त्य' म्हटले तरी फारसा फरक पडणार नाही.) याच्याउलट आपले पूर्वज तुलनेने अज्ञ बालके होती, आपल्याला सर्व काही नव्याने मिळवायला पाहिजे अशी समाजाची धारणा असली तर शिक्षणाची आबाळ होते. (नव्याने वसाहत करणाऱ्या समाजात असे कधी कधी होते). काहीवेळा तर दोन्हींची आबाळ होते, मग तो समाज प्रगत रहात नाही.

अठराव्या शतकातील भारतात अशी स्थिती होती. (बारभाईंनी लहान वयाच्या सवाई माधवरावाच्या शिक्षणाची तरतूद केली त्यात 'भविष्यपुराण' आणि 'दंडकारण्यमाहात्म्य' ही इतिहास भूगोलाची पाठ्यपुस्तके होती! पेशव्यांना इंग्रज वकिलाने भेटीदाखल दिलेले घड्याळ बंद पडले तेव्हा ते मुंबईला परत पाठविण्यात आले.) एकोणिसाव्या शतकात शिक्षणातील मरगळ झटकली गेली; विसाव्या शतकात शिक्षणाला खरी गती मिळाली. विसाव्या शतकात संशोधनातील मरगळ थोडी दूर झाली, पण झटकली गेली नाही; स्वातंत्र्य मिळाल्यावर संशोधनाला गती मिळाली, पण खरी गती अजून मिळायची आहे. आपले पूर्वज, पाश्चात्त्य आणि पाश्चात्त्यांचे पूर्वज यांच्याखेरीज उरलेल्या मानवजातीकडेही बरेच संचित आहे याची जाणीव भारतात अजूनही पुरेशी नाही. (विदेशी भाषांतून वाचन करायचे म्हणजे फार तर फ्रेंच, जर्मन भाषांतून वाचन करायचे - खरे तर इंग्लिश भाषेतून वाचन केले म्हणजे खूपच अशी भावना असते.) संशोधनाला जी गती मिळाली आहे असे म्हटले ती मुख्यतः नैसर्गिक विज्ञानशाखांतून आणि त्यांच्या अभियांत्रिकी, कृषी, वैद्यक अशा विविध उपयोजनांमधून. मानवी विज्ञानशाखा, मानव्यविद्या आणि त्यांची शिक्षण, समाजकार्य अशी विविध उपयोजने या क्षेत्रामधील स्थिती मुळीच समाधानकारक नाही. संशोधनाला पुरेशी गती नसली की शिक्षणात सुधारणा होत नाही. शिक्षणात सुधारणा होत नाही तोपर्यंत संशोधनात दर्जा येत नाही, किंबहुना प्रेरणाच मिळत नाही. या घातचक्राचे प्रसादचक्रात रूपांतर कसे व्हायचे ?

संचित ज्ञानाच्या पलीकडे शोध घेण्याची बुद्धी माणसाला का होते? त्याला प्रश्न पडतो म्हणून. व्यावहारिक अडचण आल्यावर कोणालाही प्रश्न पडेल, पण तशी अडचण

नसतानाही प्रश्न पडण्यासाठी जिज्ञासू अभिवृत्ती पाहिजे. (जिज्ञासू अभिवृत्ती ही काही पीएच.डी. पदवी पदरात पडल्यावर लोप पावणारी किंवा निवृत्ती मिळाल्यावरच जागृत होणारी अभिवृत्ती नव्हे!) असा प्रश्न पडल्यावर जरूर ते ज्ञान स्वतःच्या संचितात घालण्याची बुद्धी व्हायला जिज्ञासा तीव्र हवी. (नादुरुस्त घड्याळ इंग्रजांकडे पाठविणारांची बुद्धी नको!) प्रश्न पडण्याची क्षमता आणि प्रश्नाचे उत्तर मिळेपर्यंत चैन न पडण्याची वृत्ती ही संशोधनाची पूर्व अट आहे. येरा गबाळाचे काम नोहे. आपले पूर्वज म्हणत असत की समोर विषय असून भागत नाही, विशय म्हणजे चैन पडू न देणारा संदेहही तितकाच आवश्यक आहे. संदेहामुळे सुचलेले उत्तर पारखण्याची बुद्धी होते.

नव्या संशोधकाला संशोधन-नैपुण्य पुरेसे नसणार, त्यासाठी संशोधन शिक्षकाची म्हणजे मार्गदर्शकाची गरज असते. मार्गदर्शकाचे काम मार्ग दाखवण्याचे आहे. ठेच लागलीच तर हात देण्याचे आहे, उत्साह कमी पडला तर प्रेरणा देण्याचे आहे. नव्या संशोधकाला निव्वळ मदतनिसाची भूमिका देऊन त्याचे काम आपणच करून टाकायचे याला मार्गदर्शन म्हणू नये. फारतर पीएच.डीची गिरणी टाकणे म्हणावे. नव्या संशोधकाला आपली मते बनविण्यासाठी आणि त्यांच्या समर्थनासाठी, पुरावा गोळा करण्यासाठी प्रोत्साहित न करता आपली मते त्याच्यावर लादणे म्हणजे मार्गदर्शन नाही. शिष्याकडून पराजित होण्याची ज्याच्या मनाची तयारी नाही त्याने आचार्य होऊ नये, गुरुबाजी करण्यात समाधान मानावे. संशोधनाचे परीक्षण संशोधक आपल्या चिंतनात करील, बरोबरीच्या इतर संशोधकांशी चर्चा होते त्यातून परीक्षण होईल, फार काय संशोधक आपल्या संशोधनावर आधारलेले आपले प्रगत अध्यापन करील तेव्हा बुद्धिमान आणि जिज्ञासू विद्यार्थ्यांच्या शंकांचे समाधान त्याला करावे लागेल त्यातून हे परीक्षण होईल. नव्या संशोधकांचे संशोधन मात्र परीक्षणकर्त्यांकडे पाठविण्याची पद्धत असते. परीक्षणकर्त्याचे काम प्रबंधातील प्रतिपाद्याशी आपण सहमत होतो का हे पाहण्याचे नसून प्रबंधकर्त्याने आपली मांडणी आणि समर्थन हे चोख केले आहे का हे पाहण्याचे आहे. प्रतिपाद्य पटले पण समर्थन ढिसाळ असल्यामुळे पटले नाही असेही होऊ शकते!

आधी प्रश्न विचारण्याचा कंटाळा, विचारला तर उत्तरादाखल नवा प्रस्ताव मांडण्याचा कंटाळा, प्रस्ताव मांडलाच तर स्वतः कठोर परीक्षण करण्याचा कंटाळा किंवा इतरांच्या कठोर परीक्षणाचे स्वागत करण्याचा कंटाळा मग संशोधन कार्याला बरे दिवस कसे येणार ?

**— अशोक रा. केळकर**

# गण, गणवृत्त, गणनशास्त्र, गणित व संगणक

— मनोहर राईलकर

**गण आणि गणवृत्ते :**

एखाद्या पद्यातील सलग तीन तीन अक्षरांचा एकेक गट करून त्यातील प्रत्येक अक्षर लघू की गुरू याचा निर्णय करायचा व त्यानुसार तीन अक्षरांच्या गटाचा गण ठरवायचा आणि या गणमालिकेप्रमाणे त्या कवितेचे वृत्त ठरवायचे. त्या वृत्ताला एखादे नाव द्यायचे. गण आणि गणवृत्ते ठरविण्याची प्रक्रिया स्थूलमानाने अशी आहे.

अक्षरे तीनच का? दोन किंवा चार, किंवा दुसरी कोणती संख्या का नाही? याचे कदाचित एकच कारण संभवते. दोन फारच लहान. कारण एकूण गण चारच होतात आणि उलट, चार किंवा अधिक अक्षरांमुळे गणांची संख्या फारच वाढेल. चार अक्षरांमुळे १६, पाच अक्षरांमुळे ३२ गण होतात. पण गणिताच्या दृष्टीने मात्र हे बंधन कृत्रिमच ठरते.

**गणनशास्त्र :**

लघू-गुरू अक्षरांनुसार विविध प्रकारचे (तीन अक्षरी) आठ गण आहेत हे सर्वजण जाणतात. प्रश्न असा की गणांची संख्या नेमकी आठच का? कमी किंवा जास्त का होऊ शकत नाही? किंवा वर म्हटल्याप्रमाणे चार अक्षरी गण १६ का? याचे उत्तर गणन–शास्त्र देऊ शकते. गणनशास्त्र म्हणजे काय याबद्दल थोडीफार कल्पना देणे जरुरीचे आहे. (दुसरा शब्द न सुचल्याने मी Combinatorics करता गणनशास्त्र हा शब्द वापरला आहे.)

एखादी कृती ही अंतर्गत अनेक कृतींवर अवलंबून असते. त्या अंतर्गत कृती प्रत्यक्षात आणण्याचे किती वेगवेगळे पर्याय आहेत हे सांगितले असता इष्ट कृती किती वेगवेगळ्या प्रकारे करता येते हे सांगण्याची रीत म्हणजे गणनशास्त्र, असे मोघमपणे म्हणता येईल. (ही व्याख्या नव्हे.) त्याच दृष्टीने तीन अक्षरांचा एक गण मानल्यास ते एकूण किती? असा आपला प्रश्न. अगदी सहज समजेल असे उदाहरण घेऊ. समजा एखाद्याजवळ ३ वेगवेगळ्या पँटी आहेत आणि ४ वेगवेगळे शर्ट आहेत. बाहेर जाताना तो किती वेगवेगळ्या प्रकारे वेशभूषा (पँट शर्ट पुरतीच) करून जाऊ शकेल? कृती आहे वेशभूषा करण्याची आणि अंतर्गत कृती आहेत दोन. पँट घालणे आणि शर्ट घालणे. एक पँट चढविल्यावर शर्ट घालण्याचे वेगवेगळे ४ प्रकार आहेत. दुसऱ्या पँट करताही चार प्रकार आहेत आणि तिसरी करताही चारच प्रकार आहेत. म्हणजेच ४ प्रकार प्रत्येकी तीन वेळा. म्हणून ४ × ३ = १२. पुढे, समजा, बुटांच्या ६ जोड्या आहेत. मग हे १२ प्रकार बुटांच्या प्रत्येक जोडीबरोबर संभवतात. मग पँट, शर्ट आणि बूट घालण्याचे

एकूण १२ × ६ = ७२ वेगवेगळे प्रकार होतात. हे आणखी वाढवता येईल. पण मुख्य मुद्दा समजला असेल तर त्याची जरुरी नाही. हाच नियम आपण गणांचे वेगवेगळे प्रकार ठरवण्याकरिता लावू शकतो. अंतर्गत कृती म्हणजे प्रत्येक अक्षर लघू किंवा गुरू असणे. पहिले अक्षर २ प्रकार, दुसरे अक्षर २ प्रकार आणि तिसऱ्या अक्षराचेही २ प्रकार. म्हणून तीन अक्षरी गणांचे २ × २ × २ = ८ प्रकार होतात. चार अक्षरी गण १६ होतील, हे आता सरळ आहे.

गणनशास्त्राच्या मदतीने आणखी काही प्रश्नांची उत्तरे सहज मिळण्यासारखी आहेत, तीही पाहू. ९ अक्षरी वृत्ते किती असतील? शेवटचे अक्षर ऱ्हस्व असले तरी नेहमी गुरूच असते. म्हणून शेवटच्या अक्षराला पर्याय एकच. त्यामुळे विचार फक्त आठच अक्षरांचा करावा लागेल. म्हणून ९ अक्षरी वृत्तांचे एकूण २५६ (८ वेळा २ घेऊन गुणाकार) प्रकार होतील. गणिताला पसंत पडणाऱ्या भाषेत बोलायचे तर, २ चा आठवा घात. शार्दूल विक्रीडितात १९ अक्षरे असतात. शेवटच्या अक्षराकरिता एकच पर्याय आहे. म्हणून १९ अक्षरी वृत्तांचे एकूण २ चा अठरावा घात (२,६२,१४४) इतके प्रकार होतील ! भुजंगप्रयातात १२ अक्षरे असतात. १२ अक्षरी वृत्तांचे २ चा अकरावा घात (२०४८) इतके प्रकार होतील. ज. वि. ओकांच्या गीर्वाणलघुकोशात (१९१५) सर्वांत लहान किमान चार अक्षरांचे 'कन्या' नावाचे वृत्त आढळले. २७ किंवा जास्त अक्षरांच्या वृत्तांना दंडक म्हणतात. गणिताच्या दृष्टीने वृत्तात जास्तीत जास्त किती अक्षरे असावीत हेही बंधन (गणांप्रमाणेच) कृत्रिम आहे. पण व्यावहारिक बंधन म्हणून २७ अक्षरांपर्यंतच जायचे ठरवले तर एकूण वृत्तसंख्या किती होईल? गणनशास्त्राने या प्रश्नाचे उत्तर सहज देता येईल. २ च्या तिसऱ्या घातापासून २ च्या २६ व्या घातापर्यंत, घेऊन त्या सर्व संख्यांची बेरीज करायची. ही बेरीज किती येते ते सांगणेही गणिताला अवघड नाही. ही संख्या ६.७ कोटींहूनही अधिक होईल ! जाता जाता येथे आणखी एका मजेशीर मुद्द्याचा उल्लेख करतो. एकट्या २८ अक्षरी वृत्तांचीच संख्या या बेरजे इतकी (६.७ कोटी) होईल ! आणि फक्त २९ अक्षरी वृत्तांची संख्या ६.७ + ६.७ = १३.४ कोटी होईल ! म्हणजे प्रत्येक वेळी दुप्पट दुप्पट होईल. उदा. फक्त ३० अक्षरी वृत्तांची संख्या १३.४ + १३.४ = २६.८ कोटी होईल.

इतक्या सगळ्या वृत्तांना नावे द्यायची (आणि ती लक्षात ठेवायची) म्हणजे अशक्यच. पण, गणित म्हणते, नावापेक्षा अनुक्रमांक का देत नाही? अनुक्रमांक कसे द्यायचे? त्या दृष्टीने गणित काही मदत करू शकेल का? होय, करू शकेल, कसे ते पाहणे, हाच या लेखाचा हेतू आहे.

**लो. टिळक :**

येथे ज्या प्रकारे गणित आणि गणवृत्त यांचा एकत्र विचार केला आहे, तसा यापूर्वी आणखी कुणी केला होता की नाही, हे मला माहीत नाही. पण प्रा. मा. ना. आचार्यांनी

पुढील माहिती दिली. ती येथे देणे अप्रस्तुत ठरणार नाही. तत्त्वतः सर्व वृत्तांचा शोध घेण्याचा पहिला प्रयत्न लो. टिळकांनी केला असावा. याचा उल्लेख श्री. न. र. फाटकांनी लिहिलेल्या त्यांच्या चरित्रात सापडतो. ('लोकमान्य' मौज प्रकाशन १९७२, पृ. १३.) ते लिहितात, "आपल्या कॉलेज जीवनात (सुमारे १८७१) टिळकांनी काव्यरचनेच्या अभ्यासार्थ प्रस्तारवृत्तांचे (रूढ वृत्तांबाहेर गणमात्रांच्या गणिताने जुळवलेली नवी वृत्ते) एक टिपण तयार केले. ते त्यांच्यापाशी चाळीस-पंचेचाळीस वर्षे सुरक्षित राहिले होते. मोरोपंत पराडकरांची संस्कृत कविता त्यांच्या हस्तलिखितावरून छापण्याचे काम सुरू झाले तेव्हा त्या कवितांमधील एका कवितेचे वृत्त परिचित वृत्तांबाहेरचे निघाले आणि संपादकांना त्याचे कोडे पडले. मयूर काव्य प्रकाशनाचे अध्वर्यू रा. द. पराडकर यांनी हा प्रश्न टिळकांना विचारला. तेव्हा प्रस्तार वृत्तांसंबंधातील (टिळकांच्या) कामगिरीचे गुपित फुटले... कवितेला वृत्त हवे, वृत्तांना गणिताचे नियम आहेत. तेव्हा वृत्ते गणिताचा शेवट करतात, का गणिताने नवी अपूर्व वृत्ते निर्माण करणे शक्य आहे, या विषयाकडे टिळक वळले आणि प्रस्तारवृत्तांचे क्षेत्र त्यांनी 'व्यापून' टाकले." (अवतरण माझे.) लो. टिळकांनी सर्व वृत्तांचा विचार केला असावा असे, 'व्यापून' या शब्दामुळेच वाटते.

**द्विचिन्ह पद्धत :**

या (किंवा द्विमान किंवा द्विविधा म्हणजे Binary) पद्धतीत नेमके दोन पर्याय अपेक्षित असतात. याची अनेक उदाहरणे देता येतील. १) स्विच (किंवा दिवा) बंद वा चालू २) वर वा खाली ३) डावा-उजवा ४) धन-ऋण ५) सत्य-असत्य ६) आत-बाहेर ७) बरोबर-चूक ८) पास-नापास ९) इ. स. पूर्व-नंतर १०) ऱ्हस्व-दीर्घ आणि ११) आता आपण ज्याचा विचार करणार आहोत ते लघु-गुरू. (व्यावहारिक उदाहरणांचे स्वरूप सहसा शुद्ध गणिती नसते, म्हणून काही व्यावहारिक उदाहरणांत अधलेमधले पर्यायही संभवतात.)

विविध प्रकारची अंकगणिते बाह्यतः वेगळी वाटली तरी अंतर्गत रचनेच्या दृष्टीने ती आपल्या अतिपरिचित दशचिन्ह अंकगणिताप्रमाणेच आहेत. परिचित पद्धत दशमान अंकगणित या नावानेही प्रसिद्ध आहे. द्विचिन्ह पद्धतीचा उलगडा होण्यासाठी आपल्या दशचिन्ह पद्धतीचे अंतरंग चांगले समजून घेतले पाहिजे. हाच भाग गणितेतर वाचकांना कदाचित कंटाळवाणा वाटण्याचा संभव आहे. परंतु त्याकडे दुर्लक्ष करू नये अशी विनंती आहे. उलट ज्यांचा भाषाविषय चांगला आहे. पण काही ना काही कारणामुळे गणिताकडे आजवर दुर्लक्ष झाले, त्यांनी माझ्या विनंतीचा राग न मानता, हा भाग अधिक बारकाईने वाचावा, असा आग्रह आहे.

**दशचिन्ह पद्धत :**

दशचिन्ह पद्धत किंवा दशमान पद्धत म्हणजे केवळ दहाच चिन्हांच्या मदतीने व स्थानपरत्वे चिन्हांची किंमत बदलून (बदलण्याचा संकेत ठरवून) कितीही मोठी संख्या व्यक्त करण्याची पद्धत, असे वर्णन करता येईल. (ही पद्धत व संबंधित अंकचिन्हे हिंदू-पद्धत व हिंदू अंकचिन्हे म्हणून जगभर मान्यता पावली आहेत.)

ही पद्धत आपण व्यक्तिशः कित्येक वर्षे वापरत असल्यामुळे, कदाचित, आपल्याला फार सोपी वाटत असेल. पण त्या पद्धतीचे अंतरंग माहीत नसल्यामुळे दुसरी एखादी पद्धत मूलतः तशीच असली तरी समजण्यास अवघड जाते. ती समजण्यासाठीच दशचिन्ह पद्धत बारकाईने अभ्यासण्याची जरुरी आहे, असे मी म्हटले आहे.

समजा आपल्याकडील वस्तूंची संख्या ३७४५ इतकी असेल तर, त्याचा दशचिन्ह पद्धतीतील अर्थ ३ सहस्त्रक, ७ शतक, ४ दशक, ५ एकक (सुट्टे) असा असतो. कमीत कमी नोटांत इतकी रक्कम देण्याचा विचार करावा. (१, १०, १०० अशाच नोटांचा उपयोग करायचा, हे सरळ आहे.) ही संख्या विस्तारित रूपात अशी लिहू.

३००० + ७०० + ४० + ५ = ३ × १००० + ७ × १०० + ४ × १० + ५ किंवा गणिताला अधिक आवडणाऱ्या भाषेत मांडायचे झाले तर,

३ × १० चा घन + ७ × १० चा वर्ग + ४ × १० + ५

असा असतो. हे सर्वांना माहीत असेलच. १० ला १० चा पहिला घात असेही म्हणण्याचा गणितात प्रघात आहे. (शेवटचा अंक ५, हाही ५ × १ = ५ × १० चा शून्याचा घात म्हणून लिहिता येईल.) दशचिन्ह पद्धत का रूढ झाली असावी, असा प्रश्न मनात येणे स्वाभाविक आहे. त्याचे सरळ उत्तर म्हणजे, प्रत्येक हाताला पाच पाच अशी दोन हातांना मिळून दहा बोटे आहेत हेच. समजा प्रत्येक हाताला चार बोटे असती तर अर्थातच अष्टचिन्ह पद्धत प्रचारात आली असती, हे उघड आहे. प्रत्येक हाताला सहा बोटे असती तर द्वादशचिन्ह पद्धत रूढ झाली असती. (हातापायांची वीस बोटे होत असल्यानेच इंग्रजीत, score = २० असा शब्द रूढ झाला असावा.)

आणखी एक मुद्दा. जरी दशचिन्ह पद्धत अधिक करून आपल्या व्यवहारात असली तरी आपण इतरही पद्धतींचा वापर करीत असतोच. दोन उदाहरणे देतो.

ग्रोस, डझन, वस्तू या मोजणीशी आपला परिचय आहेच. तेथे द्वादशचिन्ह पद्धत वापरली आहे, असे म्हणता येईल. कारण असलेल्या वस्तूंची संख्या ग्रोस-डझन-वस्तू या प्रकारे सांगण्यासाठी प्रथम आपण बारा बारा वस्तूंचे गट करतो, हे आठवत असेल. अशा तऱ्हेने तयार झालेल्या गटांना आपण डझन म्हणतो. डझनांची संख्या बारा किंवा जास्त झाली तर आपण बारा बारा डझनांचे गट करतो. या गटांना आपण ग्रोस म्हणतो. ३

ग्रोस ५ डझन ८ वस्तू ही वस्तूंची संख्या विस्तारित रूपात ३ ×१२ चा २ रा घात + ५ × १२ चा पहिला घात + ८ अशी लिहिता येईल. द्वादशचिन्ह पद्धतीत सर्वांत मोठा अंक ११ असेल. ११ हा अंक कसा असे आपल्या मनात येईल. त्या शंकेचे निराकरण असे. १० आणि ११ यांच्याकरता आपल्याकडे अंकचिन्हे नाहीत. ती नव्याने करावी लागतील. मग हा प्रश्न उद्‌भवणार नाही. (इंग्रजी गणितात A आणि B ही अक्षरे वापरतात. विषय तो नसल्याने आपण यात वेळ दवडण्याचे कारण नाही.)

आपल्या परिचयातील दुसरे उदाहरण म्हणजे तास-मिनिटे-सेकंद. उपलब्ध सेकंदांचे तास-मिनिटे-सेकंद करण्याकरता हीच पद्धत वापरली जाते. पण गट साठासाठांचे करावे लागतात. कोनांच्या मापांकरताही (अंश-मिनिटे-सेकंद) साठाचेच परिमाण वापरले जाते. या पद्धतीला षष्टिचिन्ह पद्धत म्हणता येईल. असो, हे सारे परिचयाचे असल्यामुळे यावर जास्त वेळ घालवणे योग्य होणार नाही. मुख्य मुद्दा समजला असला म्हणजे झाले. २ तास १६ मिनिटे ४७ सेकंद ही सेकंदांची संख्या विस्तारित रूपात २ × ६० चा २ रा घात + १६ × ६० चा पहिला घात + ४७ अशी लिहिता येईल. या म्हणजे षष्टिचिन्ह पद्धतीत सर्वात मोठा अंक ५९ असेल. हे आपण सहज समजू शकतो. कारण ५९ सेकंदांत आणखी १ मिळवला की पूर्ण मिनिट होईल आणि सेकंदांच्या स्थानी ० दिसू लागेल. (१० ते ५९ यांच्याकरता आपल्याला नवीन चिन्हे करावी लागतील, हे ओघानेच आले. टीव्हीचे घड्याळ किंवा हातावरचे डिजिटल घड्याळ आठवावे).

हे सर्व विवेचन चांगले समजले असेल तर द्विचिन्ह पद्धत समजणे फारसे कठिण जाणार नाही. पण, येथपर्यंतचे विवेचन समजले नसेल तर पुन्हा वाचावे, अशी विनंती आहे. त्या पद्धतीत तर नवीन चिन्हे करण्याचाही प्रश्न उद्‌भवणार नाही. उलट, असलेल्यातलीच काही चिन्हे वगळावी लागतील.

दशचिन्ह पद्धतीच्या एका अंगाला स्पर्श करायचा राहिला आहे. त्याचा विचार आपल्या पुढच्या चर्चेच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. विशेषतः द्विचिन्ह पद्धतीच्या दृष्टीने तो प्रकर्षाने जाणवणारा आहे. समजा संख्या ३०५८ आहे. यातल्या '०' चा अर्थ काय? शून्य विस्तार करून लिहिताना ही संख्या अशी लिहायची,

३ × १० चा घन + ० × १० चा वर्ग + ५ × १० + ८

आता द्विचिन्ह पद्धत समजणे पुष्कळच सोपे जाईल. द्विचिन्ह पद्धतीत दोन चिन्हे असणार, हे सरळ आहे. कोणती दोन? शेवटचे चिन्ह कोणते? दशचिन्ह पद्धतीत एकूण १० भिन्न चिन्हे आहेत. ० ते ९. शेवटचे चिन्ह ९ आहे, हे लक्षात घ्यावे. अष्टचिन्ह पद्धतीत शेवटचे चिन्ह ७ असणार. द्वादशचिन्ह पद्धतीत ११ आणि षष्टिचिन्ह पद्धतीत ५९. मग द्विचिन्ह पद्धतीत शेवटचे चिन्ह कोणते? ० आणि १ हीच दोन चिन्हे होत आणि १ हेच शेवटचे चिन्ह होय. हा मुद्दा फारच महत्त्वाचा आहे.

**द्विचिन्ह पद्धत :**

आपल्या जवळील वस्तू किती आहेत, या प्रश्नाचे उत्तर द्विचिन्ह पद्धतीत कसे द्यायचे, ते पाहू. दशचिन्ह पद्धतीत काय करतो? ते आठवल्यावर इथे काय करायचे ते समजून येईल.

आपण काही उदाहरणे पाहू. दशचिन्ह पद्धतीमधील ० आणि १ या संख्या ० आणि १ अशाच राहतील. पण २ कशी दिसेल? दशचिन्ह पद्धतीचा मोजक (Counter) आपण पहिला आहे. एकक स्थानी १, २,... ९ याप्रमाणे क्रमाने अंक झाल्यावर ९ हा सर्वांत मोठा अंक असल्यामुळे त्याच्यानंतर पुन्हा ० दिसू लागते आणि दशकस्थानी १ हा अंक दिसतो. कारण ९ हा शेवटचा अंक असतो. षष्टिचिन्ह पद्धतीत ५९ सेकंदांनंतर पुन्हा ० सेकंद दिसतात हे आपण डिजिटल घड्याळात पाहतो. द्विचिन्ह पद्धतीचा मोजक काय करील? ०, १ झाल्यावर १ हा सर्वांत मोठा अंक असल्यामुळे तिथे पुन्हा ० हाच अंक दिसेल आणि दुसऱ्या (डावीकडे) स्थानी १ हा अंक दिसेल. म्हणजे २ ही संख्या द्विचिन्ह पद्धतीत १० (एक-शून्य) अशी दिसेल. मोजकाचे काम चालू ठेवले तर पुढची संख्या (म्हणजे ३) ११ अशी होईल. कारण एकक स्थानीचा शून्य बदलून तेथे १ येईल. पुढे आणखी एकदा १ ने वाढ केली तर काय होईल? याचे उत्तर काहीसे अवघड वाटण्याचा संभव आहे. पहिल्या स्थानाच्या १ ऐवजी ० येईल आणि मागील अंकात १ ची भर करावी लागेल. पण तेथे तर आधीच १ आहे. त्यात आणखी १ ची भर घातली तर तेथे ० येऊन त्याच्या मागील बाजूस १ हा अंक दिसू लागेल. म्हणजे ४ ही संख्या द्विचिन्ह पद्धतीत १०० अशी दिसेल. ११ डझन ११ वस्तूंमध्ये आणखी १ वस्तूची भर घातली तर काय होईल? ११ वस्तूंच्या १२ वस्तू म्हणजेच १ डझन होईल आणि सुट्या वस्तू ० असतील. हा नवा १ डझन आणि पूर्वीचे ११ डझन मिळून १२ डझन म्हणजे १ ग्रोस होईल. पण डझनाच्या स्थानीही ० दिसेल. म्हणजे ११ डझन ११ वस्तू अधिक १ मिळून १ ग्रोस ० डझन ० वस्तू होतील. ५९ मिनिटे ५९ सेकंदात १ सेकंद मिळवल्यावर काय होईल ते आता समजेल (डिजिटल घड्याळ).

५ ही संख्या १०१ अशी ६ ही ११०, ७ ही १११, ८ ही १००० अशा दिसतील. हा अभ्यास उलट सुलट दोन्ही प्रकारे, करून पाहण्यासारखा आहे.

द्विचिन्ह पद्धतीतील १०१ ही संख्या विस्तार करून कशी दिसेल ते आपण पाहू.

१०१ = १ × २ चा २ रा घात + ० × २ चा १ ला घात + १ = ४ + ० + १ = ५

१११ = १ × २ चा २ रा घात + १ × २ चा १ ला घात + १ = ४ + २ + १ = ७

समजा वस्तूंची संख्या द्विचिन्ह पद्धतीत १०११११ आहे. म्हणजे दशचिन्ह पद्धतीत किती? १ × २ चा ५ वा घात + ० × २ चा ४ था घात + १ × २ चा घन + १ × २ चा वर्ग + १ × २ + १ = ३२ + ० + ८ + ४ + २ + १ = ४७





अनुक्रमणिका

प्रत्यक्षात इतकी कसरत करण्याची जरुरी नाही. ९ ग्रोस, ७ डझन, ५ वस्तूंच्या वस्तू करण्यासाठी आपण प्रथम ९ ग्रोसांचे डझन करतो (९ × १२ = १०८). त्यात ७ डझन मिळवतो (११५). त्यांच्या सुट्या वस्तू करतो (११५ × १२ = १३८०) आणि शेवटी सुट्या ५ मिळवतो. म्हणजे १३८५. द्वादशचिन्ह पद्धतीतील ९७५ ही संख्या दशचिन्ह पद्धतीत १३८५ अशी दिसेल. या उलट, १३८५ वस्तू ग्रोस-डझन-वस्तू या स्वरूपात लिहिण्याकरता काय करावे लागेल? १३८५ ला बाराने भागल्यावर भागाकार ११५ (डझन) येईल आणि बाकी ५ (सुट्या वस्तू) येईल. पुन्हा, ११५ डझनांचे ग्रोस करण्याकरता ११५ ला १२ ने भागल्यावर भागाकार ९ (ग्रोस) येईल आणि ७ डझन उरतील.

द्विचिन्ह पद्धतीमधली १०११११ ही संख्या दशचिन्ह पद्धतीत रूपांतरित करण्याकरता,

| | |
|---|---|
| १ × २ = २ | सर्वांत डावीकडच्या १ ला २ ने गुणले. |
| २ + ० = २ | गुणाकारात पुढचे ० मिळवले. |
| २ × २ = ४ | बेरजेला २ ने गुणले. |
| ४ + १ = ५ | गुणाकारात पुढचा १ मिळवला. |
| ५ × २ = १० | बेरजेला २ ने गुणले. |
| १० + १ = ११ | त्यात पुढचा १ मिळवला. |
| ११ × २ = २२ | पुन्हा २ ने गुणले. |
| २२ + १ = २३ | त्यात पुढचा १ मिळवला. |
| २३ × २ = ४६ | पुन्हा २ ने गुणले. |
| ४६ + १ = ४७ | त्यात शेवटचा १ मिळवला. |

या उलट, दशचिन्ह पद्धतीतील ४७ द्विचिन्ह पद्धतीत कशी दिसेल तेही पाहता येईल. ४७ ला २ ने भागल्यावर भागाकार २३ येतो आणि १ बाकी उरते. ही बाकी एकक स्थानी लिहिली आहे. पुन्हा २३ ला २ ने भागल्यावर भागाकार ११ येतो आणि बाकी १ उरते. ती उजवीकडून दुसऱ्या स्थानी लिहिलेली दिसेल. ११ ला भागल्यावर भागाकार ५ आणि बाकी १ येते. ५ ला २ ने भागल्यावर भागाकार २ येऊन बाकी १ उरते. २ ला २ ने भागल्यावर भागाकार १ बाकी ०. शेवटी १ राहतो. म्हणून ४७ ही संख्या द्विचिन्ह पद्धतीत १०११११ अशी दिसेल.

हे सर्व, गणिताबाहेरील वाचकांना कंटाळवाणे वाटेल याची मला कल्पना आहे. पण माझा मुद्दा समजून घेण्याकरता ही चर्चा आवश्यक आहे. दशचिन्ह ते द्विचिन्ह आणि उलट बदल करता येणे जरुरीचे आहे.





अनुक्रमणिका

**गणांचे द्विचिन्ह आणि दशचिन्ह क्रमांक :**

४ अक्षरी वृत्तांपासून २७ अक्षरी वृत्तांपर्यंत एकूण सुमारे ६.७ कोटी इतकी वृत्तसंख्या होते, हे आपण वर पाहिलेच आहे. इतक्या वृत्तांना वेगवेगळी नावे देणे व्यवहारतः अशक्य आहे, असे आपण लेखाच्या आरंभी म्हटले आणि त्याच कारणाकरिता, आपण त्यांना अनुक्रमांक द्यावा असाही उल्लेख केला. आता त्याचाच विचार करू. या ठिकाणी आता गणांना महत्त्व राहिले नाही. प्रत्येक अक्षराच्या लघु-गुरुत्वाचाच विचार कर्तव्य आहे. पण हवेच असेल तर, ल = ० आणि ग = १ असे समजून गणांचे द्विचिन्ह आणि दशचिन्ह पद्धतींतील क्रमांक पुढील कोष्टकाप्रमाणे येतील.

| गण | द्विचिन्ह | दशचिन्ह |
|---|---|---|
| न | ००० | ० |
| स | ००१ | १ |
| ज | ०१० | २ |
| य | ०११ | ३ |
| भ | १०० | ४ |
| र | १०१ | ५ |
| त | ११० | ६ |
| म | १११ | ७ |

गणिताच्या दृष्टीने गणांचे दशचिन्ह पद्धतीतील हे क्रमांक लक्षात घेता त्यांचे हे अनुक्रमांक अधिक नैसर्गिक आहेत, असे नाही वाटत?

**वृत्तांचे द्विचिन्ह आणि दशचिन्ह क्रमांक :**

उदाहरणाकरिता अतिपरिचित असे शार्दूलविक्रीडित हे वृत्त घेऊ. त्याचे गण मांडण्याऐवजी अक्षरांचे लघु-गुरुत्व ल आणि ग या अक्षरांनी दाखवू. मग हे वृत्त असे दिसेल.

गगग ललग लगल ललग गगल गगल ग

आणि द्विचिन्ह गणितात हे वृत्त असे दिसेल.

१११ ००१ ०१० ००१ ११० ११० १

(तीन अंकांनंतर मोकळी जागा सोडण्याची गणिताची मागणी नाही आणि गणित याप्रमाणे डावीकडून सुरुवात करीतही नाही. उजवीकडून करते. 'अंकानां वामतो गतिः'। पण वाचण्यास आणि मूळच्या मांडणीशी तुलना करण्यास सोपे जात असल्यामुळे मी तशी मांडणी केली आहे. गणितातही याच कारणाकरिता संख्या दशसहस्र, दशलक्ष इ. गट करून लिहितात.) याचे दशचिन्ह रूपांतर ४,६९,२२९ असे येईल. थोडक्यात हा शार्दूलविक्रीडिताचा अनुक्रमांक झाला. एकदा याप्रमाणे मांडणी केली की त्या वृत्ताची

अक्षरे लघू की गुरू याची सर्व माहिती मिळेल. म्हणजेच वृत्तांना अनुक्रमांक दिले की आपण संगणकाच्या मदतीने पुढचे काम सहज करू शकू. वृत्त आणि त्यांचे दशचिन्ह अनुक्रमांक यांच्या जोड्या संगणकाला पुरवायच्या. दशचिन्ह पद्धत आणि द्विचिन्ह पद्धत यांची अदलाबदल करण्याचा प्रोग्राम (आज्ञावली) संगणकाला सांगायचा. (हा प्रोग्राम त्याला माहीतच असतो. त्यासाठी निराळा वेळ दवडण्याचे कारण पडणार नाही.) मग, वृत्त दिले म्हणजे त्याचे नाव दिले की, संगणक त्याचा दशचिन्ह अनुक्रमांक शोधील, दशचिन्हाचे द्विचिन्ह रूपांतर घडवील आणि लघु-गुरू अक्षरांची मालिका आपल्याला तो तत्काळ देईल. खरे तर दशचिन्ह अनुक्रमांकाची गरज संगणकाला नाही. पण आपण स्वतः या रीतीचा वापर करणार असलो तर वृत्ताच्या नावाबरोबर गणांपेक्षा अनुक्रमांकच दशचिन्ह पद्धतीत लक्षात ठेवणे सोयीचे. आपल्याला गणच पाहिजे असतील तर तेही संगणक देऊ शकतो.

गणांच्या अनुक्रमांकांप्रमाणे हेही अनुक्रमांक नैसर्गिक आहेत, असे वाटत नाही का?

या पद्धतीचा विशेष असा की केवळ आजवर परिचित असलेलीच नव्हेत तर सर्वच वृत्तें, आजवर कुणी मनातसुद्धा आणली नसतील अशी वृतेही या मार्गाने आपल्याला मिळतील. म्हणजे लो. टिळकांच्या मनात असलेली (आणि कदाचित नसलेलीही) सर्व प्रस्तार वृत्ते मिळतील. शिवाय, या वृत्तांच्या बाहेर आता एकही वृत्त संभवणार नाही याची **निर्विवाद ग्वाही** गणित देते.

**सावधान :**

या मांडणीत एक त्रुटी आहे. तिचा विचार केला नाही तर प्रतिपादनात फार मोठा दोष राहील. वृत्ताच्या आरंभी लघू अक्षर आले, तर ही रीत आपल्याला चुकीची माहिती देऊन भलतीकडेच नेण्याची शक्यता आहे. कसे ते पाहू. आरंभीचे अक्षर लघू असणारे चार गण आहेत. वरच्या यादीतले पहिले चार. न-गण (ललल), स-गण (ललग), ज-गण (लगल) आणि य-गण (लगग). या चारांपैकी एखादा गण आरंभी असेल तर अशा वेळी गणित त्या अक्षरांकडे दुर्लक्ष करील. जसे, ०३४५ ही संख्या आपण चार अंकी न मानता, आरंभीचे शून्य दुर्लक्षून तीन अंकीच मानतो, तद्वतच आरंभी न-गण असताना आरंभीच्या तिन्ही अक्षरांकडे दुर्लक्ष केले जाईल आणि संगणक द्रुतविलंबित वृत्त बाराऐवजी नऊ अक्षरीच मानण्याचा धोका आहे. ज आणि य गणांमधल्या पहिल्या, तसेच स-गणाच्या पहिल्या दोन्ही अक्षरांकडे संगणक दुर्लक्ष करून आपल्याला भलतीच माहिती पुरवण्याची शक्यता आहे. मंदारमाला वृत्तात ७ त-गण आणि शेवटी गुरु, तर मंदारमालेतच आरंभी एक लघू अक्षर घालण्याने सुमंदारमाला मिळते. (सुमंदारमालेत मंदारमालेहुनी आदि ये एक लघ्वक्षर.) त्यामुळे मंदारमाला आणि सुमंदारमाला या वृत्तांत संगणक फरक करू शकणार नाही.

ही त्रुटी दूर करणे आपले कर्तव्य आहे. उपाय असा. आरंभी एक गुरू अक्षर वाढवायचे. हा नियम सर्व वृत्तांसाठी पाळायचा. आरंभीचे अक्षर गुरू आहेच, **असे म्हणून दुर्लक्ष करायचे नाही. नाहीतर त्यामुळे आणखी काही प्रकारचे घोटाळे होण्याचा संभव राहील.** मग, शार्दूलविक्रीडिताचा सुधारित द्विचिन्ह अनुक्रमांक असा दिसेल,

११ ११० ०१० १०० ०११ १०१ १०१

आणि त्याचे (सुधारित) दशचिन्ह रूपांतर ९,९३,५१७ असे होईल. म्हणजे हा शार्दूलविक्रीडिताचा सुधारित अनुक्रमांक होईल.

काही परिचित आणि काही अल्पपरिचित वृत्तांचे अनुक्रमांक काढून दाखवले आहेत.

**शिखरिणी :**

गण : यमनसभलग. लग-रूपः लगग गगग ललल ललग गलल लग. एक जादा गुरू अक्षर आरंभी ठेवून द्विचिन्हरूपात (सुधारित द्विचिन्हरूपात)

१०१ १११ १०० ००० ११० ००१

दशचिन्ह रूप किंवा अनुक्रमांक : १,९४,६०९

**पृथ्वी :**

गणः जसजसयलग. लग-रूपः लगल ललग लगल ललग लगग लग

द्विचिन्हरूप १०१ ००० १०१ ००० १०१ १०१

अनुक्रमांक १,६६, ४४५

**वसंततिलका :**

गणः तभजजगग. लग-रूपः गगल गलल लगल लगल गग

द्विचिन्हरूप १११ ०१० ००१ ००१ ०११

अनुक्रमांक २९,७७१

**द्रुतविलंबित :**

गणः नभभर. लग-रूपः ललल गलल गलल गलग

द्विचिन्हरूप १ ००० १०० १०० १०१

अनुक्रमांक ४,३८९

**मालिनी :**

गणः ननमयय. लग-रूपः ललल ललल गगग लगग लगग

द्विचिन्हरूप १ ००० ००० १११ ०११ ०११

अनुक्रमांक ३३२४३

काही अल्पपरिचित वृत्ते :

**पंचचामर :**

गणः जरजरजग. लग-रूपः लगल गलग लगल गलग लगल ग

द्विचिन्हरूप १० १०१ ०१० १०१ ०१० १०१

अनुक्रमांक : ८७,३८१

**विद्युन्माला :**

गणः ममगग. लग-रूपः गगग गगग गग

द्विचिन्हरूप १११ १११ १११

अनुक्रमांक ५११

**कन्या :**

गणः मग. लग-रूपः गगगग

द्विचिन्हरूप ११ १११

अनुक्रमांक ३१

**दंडक :**

गणः ननररररररर. लग-रूपः

ललल ललल गलग गलग गलग गलग गलग गलग गलग

द्विचिन्हरूप : १ ००० ००० १०१ १०१ १०१ १०१ १०१ १०१ १०१

अनुक्रमांक : १३,५७,१५,६९३

**सारांश :**

याप्रमाणे कोणतेही वृत्त दिले असता त्याचा अनुक्रमांक काढणे शक्य आहे. कोणत्याही वृत्ताच्या अखेरचे अक्षर गुरूच असते. त्यामुळे द्विचिन्हरूपात शेवटी १ हाच अंक येणार. परिणामी दशचिन्हरूप एक विषम संख्याच असणार.

उलट, कोणतीही विषम संख्या घेतल्यास त्याचे प्रथम द्विचिन्हरूप करायचे, त्या रूपातला आरंभीचा १ हा अंक काढून टाकायचा आणि मग बाकीच्या १ च्या जागी गुरू आणि ० च्या जागी लघू अक्षर समजायचे की आपल्याला त्या अनुक्रमांकाचे वृत्त मिळेल. कदाचित ते आपल्या परिचयातले असेल. कदाचित, एकदम नवीनच असेल. वर म्हटल्याप्रमाणे आपल्याला गणच हवे असतील तर संगणकाला तसा प्रोग्राम (आज्ञावली) देऊन तेही साधता येईल.

येथे, कदाचित, एक शंका मनात येण्याचा संभव आहे. अनुक्रमांकांचे आकडे फार मोठे होतात. ही शंका अनाठायी आहे. कारण आपण ज्यावेळी गण-पद्धत वापरतो, त्यावेळी आपण नकळत अष्टचिन्ह पद्धत वापरतो. संख्या पद्धतीतील अंकचिन्हांची एकूण

संख्या जेवढी लहान तेवढ्या प्रमाणात संख्येतील अंकांची संख्या जास्त. उदाहरणार्थ,जेव्हा आपण केवळ लघु-गुरू लिहितो, तेव्हा नकळत द्विचिन्ह रीत वापरतो. त्यावेळी अंकांची संख्या ही नेमकी वृत्तातल्या अक्षरांएवढीच असते. षष्टिचिन्ह पद्धतीतील ५९ तास ५९ मिनिटे ५९ सेकंद ही तीन अंकी संख्या ही दशचिन्ह पद्धतीत २१५९९९ अशी सहा अंकी होईल आणि द्विचिन्ह पद्धतीत १८ अंकी होईल. इथे पुन्हा शंका येईल. ५९ तास, ५९ मिनिटे, ५९ सेकंद ही संख्या तीन अंकी कशी? षष्टिचिन्ह पद्धतीत ० ते ५९ असे ६० अंकच आहेत. पूर्वी आपण हे पाहिले आहे. (हे सर्व कंटाळवाणे वाटले तर माझ्यावर विश्वास ठेवून, ते गाळून पुढे जायला हरकत नाही).

ही झाली सर्वसाधारण चर्चा. पण आपण प्रत्यक्षही पाहू शकतो. शार्दूलविक्रीडितात ७ गणाक्षरे (मसजसततग) आहेत, तर प्रस्तावित पद्धतीत फ़क्त ६ अंकच आहेत. कोणत्याही वृत्ताचा विचार केला तरी प्रस्तावित रीतीमुळे संख्या मोठी होणारच नाही. लहानच होण्याची शक्यता अधिक, हा म्हटला तर आणखी एक लाभ होय.

गणिताच्या मदतीने आणि त्याच्यावर अवलंबून असलेल्या संगणकामुळे आपण काय काय साध्य करू शकतो, हे दाखवणे हा या लेखाचा उद्देश होता. मुख्यतः, आपण ज्ञात आणि अज्ञात अशा सर्वच वृत्तांना गवसणी घालू शकतो, हा त्याचा विशेष. तो साध्य झाला आहे की नाही हे आता मी तज्ज्ञांवरच सोपवतो. शिवाय 'द्रुतविलंबित' हे नाव काही एका दृष्टीने अर्थपूर्ण तरी आहे. पण पृथ्वी, शिखरिणी, अशा काही वृत्तांच्या नावांना, ती देताना कदाचित अर्थ असलाच तरी आज घटकेला ती निरर्थकच आहेत आणि कृत्रिमही आहेत. पण प्रस्तुत लेखात सुचवलेले क्रमांक अधिक नैसर्गिक आहेत.

**गजांजली, ४६ वाळवेकर इस्टेट, पुणे - ४११ ००९.**



# नावीन्य आणि प्रावीण्य

— श्रीपाद जोशी

'नावीन्य' आणि 'प्रावीण्य' या दोन शब्दांविषयी मला नेहमीच कुतूहल वाटत आले आहे. किंबहुना अनेकदा त्यांनी मला गोंधळातही टाकले आहे. हा गोंधळ मुख्यतः त्यांच्या शुद्धलेखनासंबंधी राहिला आहे. 'नाविन्य' की 'नावीन्य'? 'प्राविण्य' की 'प्रावीण्य'? 'नवीन' व 'प्रवीण' या विशेषणांपासून बनलेली ही भाववाचक नामे संस्कृत व्याकरणाच्या नियमानुसार बनविण्यात आली असली पाहिजेत. पण मग वामन शिवराम आपटे यांच्या १८८९ साली प्रकशित झालेल्या 'दि प्रॅक्टिकल संस्कृत इंग्लिश डिक्शनरी'त त्यांचा समावेश का करण्यात आला नसावा? संस्कृत साहित्यात या शब्दाचा वापर कोणी केला नव्हता काय? या प्रमाणित शब्दकोशात त्यांचा समावेश नसल्यामुळे डॉ. कृ. पां. कुलकर्णी यांच्या मराठी व्युत्पत्तिकोशात ते का समाविष्ट केले गेले नसावेत याची कल्पना सहज येते.

**'नावीन्य' हा शब्द अधिक आधुनिक**

या दोहोंपैकी 'नावीन्य' हा शब्द अधिक नवा, आधुनिक असावा असे वाटते त्याची कारणे अशी —

मराठी (महाराष्ट्र शब्दकोश), हिंदी (बृहत् हिंदी कोश), बंगाली ('संसद बांगला अभिधान' व 'चलन्तिका') व कन्नड (किट्टेल व बुचर यांची 'कन्नड-इंग्लिश डिक्शनरी', गॅरेटची 'कॅनरिज अँड इंग्लिश डिक्शनरी' व 'कन्नड-मराठी शब्दकोश') या भाषांमध्ये हा शब्द अगदी अलीकडील काळापर्यंत नसावा असे त्यांच्या शब्दकोशात त्याला स्थान मिळालेले नाही यावरून दिसून येते. १८३१ साली प्रसिद्ध झालेल्या मोल्सवर्थकृत मराठी-इंग्रजी शब्दकोशातही हा शब्द नाही.

मात्र 'सार्थ गुजराती जोडणी कोशा'त 'नावीन्य-न. (सं.) नवीनता' हा शब्द सापडला. त्या शब्दकोशाची पहिली आवृत्ती १९२९ साली प्रसिद्ध झाली होती. माझ्या संग्रही १९४९ साली प्रसिद्ध झालेली चौथी आवृत्ती आहे. त्या आवृत्तीत हा शब्द आहे. तो पहिल्या आवृत्तीपासून या कोशात आहे की नंतरच्या एखाद्या आवृत्तीत तो समाविष्ट झाला हे शोधून काढणे फारसे अवघड नाही.

मराठीने हा शब्द गुजरातीकडून घेतला असेल काय? तो तसा घेतला असेल तर तो घेईपर्यंतच्या काळात 'नॉव्हेल्टी' या इंग्रजी शब्दासाठी नवेपणा, नौखेपणा, नवलाई वगैरे शब्दांचाच वापर होत होता काय? १९०३ ते १९१६ या तेरा वर्षांच्या काळात हप्त्या हप्त्याने प्रकाशित झालेल्या प्रा. नी. बा. रानडे यांच्या 'दि ट्वेंटिएथ सेंचुरी इंग्लिश-मराठी डिक्शनरी' मध्ये 'नाविन्य' हा शब्द आला आहे. (नॉव्हेल व नॉव्हेल्टीच्या अर्थांमध्ये).

याचा अर्थ असा की हा शब्द पूर्वीही वापरात होता. मात्र त्याच्या 'नावीन्य' या रूपाऐवजी 'नाविन्य' हे रूप विशेष प्रचलित असावे असे दिसते.

**प्रावीण्य हा शब्द अधिक जुना**

'नावीन्य'शी तुलना करताना 'प्रावीण्य हा शब्द अधिक जुना असावा. आपट्यांचा संस्कृत-इंग्लिश कोश, कन्नडचे सर्व कोश आणि व्युत्पति कोश यांमध्ये हा शब्द आढळला नाही. मात्र इतर शब्दकोशांत हा शब्द पुढीलप्रमाणे देण्यात आलेला आहे.

**महाराष्ट्र शब्दकोश** : 'प्रावी(वि)ण्य - न. नैपुण्य; कौशल्य; शास्त्र कला इ. मध्ये निष्णातपणा, दक्षता (सं. प्रावीण्य),

**बृहत् हिंदी कोश** : 'प्रावीण्य-पु. (सं.) प्रवीण होने का भाव, कुशलता, निपुणता.

**सार्थ गुजराती जोडणी कोश** : 'प्रावीण्य-न (सं.) कुशळता'

**संसद बांगला अभिधान** : 'प्राबीण्य-बि. (विशेष्य) प्रबीणता; अभिज्ञता; नैपुण्य. [सं. प्रवीण + य (भा.) (कृदन्त शब्दे) भावबाच्ये (तद्धितान्त शब्दे) भावार्थे] **चलन्तिका** 'प्राबीण्य-प्रबीणता'.

**मोल्सवर्थकृत मराठी-इंग्रजी शब्दकोश** : 'प्रावीण्य' - n. s. Conversancy with, Versedness and skill in.

**दि ट्वेंटिएथ सेंचुरी इंग्लिश-मराठी डिक्शनरी** : Skillfulness –n कुशलता f, कौशल्य n, प्रवीणताf, प्रावीण्य n, नैपुण्य n, कुशलपणा m, चतुरपणा m.

माझ्या स्वतःच्या **'बृहत् मराठी-हिंदी शब्दकोश'** आणि **'अभिनव शब्दकोश'** (हिंदी मराठी-हिंदी व मराठी-हिंदी) या दोन्ही शब्दकोशात (सुमारे ३५ वर्षापूर्वी मी हे दोन्ही शब्द) 'नावि(वी)न्य' प्रावि(वी)ण्य' असे दोन्ही प्रकारे देऊन सुटका करून घेतली होती.

या माहितीवरून असे काही निष्कर्ष निघू शकतील.

१) हे दोन्ही शब्द अगदी आधुनिक असावेत. त्यातही नावीन्य हा शब्द जास्त अलीकडचा असावा.

२) गुजराती कोशकारांनी या दोन्ही शब्दांचा समावेश केला होता त्यावरून त्या भाषेत ते आधी आले व अनुकरणाने इतर भाषांनी त्याचा वापर केला असावा. (कै. कन्हैयालाल मुन्शी यांनी वापरलेला 'अस्मिता' हा शब्द मराठीने स्वीकारला याचे स्मरण या संदर्भात व्हावे. बंगाली व हिंदीतून आपण अनेक शब्द घेत असतो व हिंदीला असंख्य शब्द देत असतो.)

३) मराठीत नाविन्य आणि नावीन्य आणि प्राविण्य आणि प्रावीण्य अशी दोन्ही रूपे नेहमीच प्रचलित होती व व्याकरणदृष्ट्या ती दोन्ही शुद्ध मानली गेली होती.

[वा. शि. आपटे यांच्या कोशाची प. कृ. गोडे व चिं. ग. कर्वे यांनी जी संस्कारित आवृत्ती काढली आहे, (पुणे : प्रसाद प्रकाशन, ३ भागांत १९५७, पुनर्मुद्रण १९७७ - १९७९) तिच्यामध्ये नवता, नवत्व आढळतात पण नवीनता आढळत नाहीत. प्रवीणता, प्रवीणत्व आढळत नाहीत, पण प्रावीण्य आढळतो. प्रावीण्यम् साठी पुढील उदाहरणे दिली आहेत.

आविष्कृतं कथाप्रावीण्यं वत्सेन (उत्तररामचरितम् ४) ; रघुवंश १५:६८. नवीन याला समानार्थी नव, नव्य हे शब्दही आढळतात. – अशोक रा. केळकर]

रघुवंश, डॉ. केतकर मार्ग, पुणे ४११ ००४.









अनुक्रमणिका

# मला उत्तर हवंय

**– सत्त्वशीला सामंत**

अलीकडे मराठी वाङमय क्षेत्रात बऱ्याच उलथापालथी चालू आहेत. मध्यंतरी दलित साहित्याची लाट आली, ग्रामीण वाङ्मय बहराला आलं, नवकवितांचा महापूर आला, साहित्य संमेलनांना ऊत आला – अखिल भारतीय पातळीपासून स्थानिक पातळीपर्यंत गल्लोगल्ली साहित्य संमलने भरू लागली. कोकण साहित्य परिषद, कामगार साहित्य-संमेलने, मराठी विज्ञान संमेलने, कुमार साहित्य संमेलने, इ. नवीन प्रवाह मराठी साहित्य-क्षेत्रात आले. पुरस्कारांचा जमाना सुरू झाला आणि साहित्यनिष्ठांची एकच मांदियाळी झाली. एकंदरीत, मराठी साहित्याची क्षितिजे विस्तारली ही गोष्ट खरी. पण त्यामुळे मराठी भाषेचा शास्त्रशुद्ध विकास झाला का हा खरा प्रश्न आहे. उत्सवी साहित्य-संमेलनांच्या भाऊगर्दीत आणि पुरस्कारांच्या कैफात साहित्य-दिग्गजांना मराठी भाषेच्या मूलभूत प्रश्नांचे भान उरलेले नाही, असे खेदाने म्हणावेसे वाटते. कित्येक प्रश्न अनुत्तरित राहिले आहेत. या निमित्ताने असे काही प्रश्न मी 'भाषा आणि जीवन' च्या चिकित्सक वाचकवर्गापुढे मांडू इच्छिते. जाणकारांनी या प्रश्नांची गंभीर दखल घ्यावी व हे प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न करावा, अशी माझी विनंती आहे.

१) १९६२ साली नवे शुद्धलेखन-नियम अस्तित्वात आले. त्यांचे एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे टंकलेखन. यंत्रांची सोय पाहण्यासाठी मोठ्या प्रमाणावर अनुस्वारांना फाटा देण्यात आला. या निमित्ताने काही अनुस्वारांची अनावश्यक अडगळ दूर झाली हे बरे झाले. पण त्याबरोबर अर्थभेददर्शक आवश्यक अनुस्वारांचीही गच्छन्ती झाली. भाषेच्या वा लिपीच्या सोयीनुसार टंकलेखन यंत्रे घडवण्याऐवजी टंकलेखन-यंत्रांची सोय पाहण्यासाठी लेखन-पद्धतीत गैरवाजवी बदल करण्यात आले, म्हणजे साध्य आणि साधन यांची अदलाबदल केली गेली. मराठीचा अभिमान बाळगून साहित्यिक विद्वानांनी संस्कृतची नावनिशाणी पुसून टाकण्याचा प्रयत्न केला. पण त्यांनी ते पुरतेपणी केले नाही अथवा त्यांना ते जमले नाही. त्यामुळे शुद्धलेखन-नियमांत विसंगती निर्माण झाल्या. काही नियमांत संस्कृतशी फारकत घेतली आहे, तर काही नियमांत संस्कृतचे अनुसंधान राखले आहे. त्या कारणाने शिक्षकांच्या व मुलांच्या मनात संभ्रम निर्माण होतो आणि संस्कृतच्या संदर्भाशिवाय मराठी शिकणे व शिकवणेही अवघड बनते.

उदाहरणार्थ, 'कवि', 'शिशु' इ. सारखे संस्कृतमधून आलेले तत्सम ऱ्हस्वान्त शब्द मराठीत प्रथम विभक्तीपासून सर्रास दीर्घान्तच ('कवी', 'शिशू' असे) लिहावेत, पण समासात पूर्वपदी आल्यास ते मूळ संस्कृतप्रमाणे ऱ्हस्वच लिहावेत ('कविसंमेलन', 'शिशुशाळा') असे परस्पर विरोधी नियम करण्यात आले. याचे एक कारण असे संभवते की, १९६२ सालच्या शुद्धलेखन समितीत संस्कृतवादी व मराठीवादी – दोन्ही विद्वानांचा





अनुक्रमणिका

समावेश होता. त्या दोन्ही पक्षांच्या परस्परविरुद्ध आग्रहांबाबत तडजोडवादी भूमिका घेऊन, 'त्वया अर्धं, मया अर्धम्' या न्यायाने नियमांचे वाटप झाले असावे. पण याचा परिणाम असा झाला की, एकदा व्यवहारात 'कवी', 'शिशू', 'नदी' असे सर्रास दीर्घान्त शब्द बघण्याची सवय लागल्यानंतर, पुढे मोठेपणी समास-प्रक्रिया शिकताना त्यावेळी मात्र 'कविसंमेलन', 'शिशुशाळा' असे का व 'नदीकिनारा' तसाच का लिहायचा हा मुलांना संभ्रम पडू लागला आणि ते शिकणे व शिकवणे अवघड होऊन बसले. म्हणजे मराठीचे शुद्धलेखन शिकण्यासाठी संस्कृतच्या ज्ञानाची पूर्वअट आवश्यक झाली. कोशात ही रूपे ऱ्हस्वान्त असली तरी भाषा शिकण्याची सुरुवात कोशापासून होत नाही. इतकेच नव्हे तर शिक्षकसुद्धा कोशाचा वापर क्वचितच करतात. याउलट, पूर्वी 'कवि', 'रवि' हे शब्द ऱ्हस्वान्त व 'नदी' सारखे शब्द दीर्घान्तच पाहण्याची सवय लहानपणापासूनच म्हणजे जेव्हा संस्कृतच्या ज्ञानाचा गंधही नव्हता तेव्हापासून अंगवळणी पडल्याने, पुढे समासात 'कविसंमेलन', 'रविकिरण' व 'नदीतट' असेच का लिहायचे असा संभ्रम पडत नसे व ते शिकवावेही लागत नसे. ही सर्व प्रक्रिया अगदी नैसर्गिक होती.

२) परंतु १९६२ साली शुद्धलेखन महामंडळाने नियम बदलल्यापासून व ते रुळल्यापासून फार काळ लोटला आहे. आता पुन्हा चक्रे मागे फिरवता येणार नाहीत. तथापि, एकदा डोंगरमाथ्यावरून थोडेसे ढकलून दिलेले हे चक्र दिवसेंदिवस घसरणीला लागले. त्याची पुरती घसरण होऊ नये म्हणून महामंडळाने १९६२ साली केलेल्या नियमांतच काही रोधक लावलेले होते. १९८७ साली भाषा संचालनालयाने महामंडळ-पुरस्कृत 'शुद्धलेखन-नियमावली' प्रसिद्ध केली. तीमध्ये पृ. ३ वर पुढीलप्रमाणे विधान आहे – 'मराठी शब्दकोशात मात्र तत्सम (ऱ्हस्व) इकारान्त व उकारान्त शब्द ऱ्हस्वान्त लिहिणे इष्ट ठरेल. जसे – पद्धति, अनुमति, ..... अणु, वायु.... वगैरे. परंतु असे शब्द कोशाबाहेर वापरताना दीर्घान्त लिहिले पाहिजेत'. याच नियमावलीतील नियम ५ (ऱ्हस्व-दीर्घ) अनुसार तत्सम शब्द मूळ संस्कृतात ऱ्हस्वान्त असेल तर, तो समासात पूर्वपदी आला असताना तसाच ऱ्हस्वान्त लिहावयाचा आहे. याचा सारांश असा की, **तत्सम (म्हणजे संस्कृतमधून जसाच्या तसा मराठीत आलेल्या ऱ्हस्वान्त शब्दाचे कोशगत प्रातिपदिक) (मूळ) रूप ऱ्हस्वान्त असेल, तो शब्द समासात पूर्वपदी आल्यास अविकृत राहील व विभक्ति-प्रत्यय लागून वाक्यात किंवा शब्दसमूहात चालू लागला (Decline) की, प्रथमेपासूनच त्याला विकार होऊन तो दीर्घान्त लिहिला जाईल.** हा नियम पुरेसा (म्हणजे मागील परिच्छेदात म्हटल्याप्रमाणे) व्यवहार्य नसला तरी, तर्कसंगत होता वा आहे. कारण तत्सम ऱ्हस्वान्त शब्दांचे सामान्यरूप दीर्घान्त होते असे मानले आहे.

सध्या प्रचलित असलेल्या सर्व मराठी-मराठी शब्दकोशात व महाराष्ट्र सरकारच्या 'शासन व्यवहार कोशा'तही ऱ्हस्वान्त तत्सम शब्द मूळ (प्रातिपदिक) रूपात ऱ्हस्वान्तच दाखवले आहेत. १९७३ साली 'शासन व्यवहार कोश' (इंग्रजी-मराठी) प्रसिद्ध झाल्यानंतर

महत्त्वाचा असा कोणताही कोश प्रसिद्ध झाला नाही. मध्यंतरीच्या काळात 'साहित्य-संस्कृति मंडळा' च्या अखत्यारीखाली व 'केसरी ट्रस्ट' च्या विद्यमाने पुण्यात मराठी-मराठी शब्दकोशाचे काम सुरू झाले. त्याचे काही खंड तयार झाले असले तरी अनेक प्रशासकीय कारणांनी ते अद्याप प्रकाशित होऊ शकलेले नाहीत. तथापि, प्रकाशित झाल्यानंतर त्यांस शासनमान्यता मिळणारच, अशा या कोशात मात्र संस्कृतमधून आलेल्या तत्सम ऱ्हस्वान्त शब्दांचे मूळ मराठी रूप दीर्घान्त दाखवले असून, शेजारी कंसात 'मूळ संस्कृत रूप ऱ्हस्वान्त' असा निर्देश केला आहे उदा. 'कवी (वि) हा शब्द समासात पूर्वपदीं आल्यास तो ऱ्हस्वान्त लिहावा अशी सूचना आहे (अशी माहिती मला त्या कोशाच्या संपादकांकडून कळली आहे). ही अपेक्षा वाजवी आहे का? एकीकडे मराठीतील **मूळ** रूप दीर्घान्त आहे असे म्हणायचे व त्यापासून होणारे परिणामी सामासिक रूप **संस्कृत अनुसार** घ्यावे असे म्हणायचे हा 'वदतो व्याघात' नव्हे काय? ही भूमिका तर्कदुष्ट आहे असे मला वाटते. एकदा संस्कृतचा संदर्भ सोडला की पुन्हा संस्कृत रूपाकडे वळण्याचा प्रश्नच कोठे येतो? म्हणून सुधारित शुद्धलेखन-नियमांचे अनुसरण करावयाचे असेल व संस्कृतचाही अनुबंध राखावयाचा असेल तर, 'शुद्धलेखन नियमावलीत' उल्लेखिलेली भूमिका कायम ठेवावी व नव्याने येऊ घातलेल्या मराठी-मराठी शब्द कोशाच्या लेखकांनाही तीच भूमिका घेण्यास भाग पाडावे.

३) तत्सम ऱ्हस्वान्त शब्द समासात पूर्वपदी आल्यास तो तसाच ऱ्हस्वान्त लिहावा या नियमाबाबत सर्वसाधारणपणे एकवाक्यता असली तरी, 'समास' ही संज्ञा कोणत्या शब्दसमूहास लावावी वा लावू नये याबाबत भल्याभल्यांच्या मनात गोंधळ आहे. 'कविसंमेलन' हा शब्द सामासिक आहे यासंबंधी कोणाचेच दुमत नाही. पण 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ', 'पाठ्यपुस्तक निर्मिति व अभ्यासक्रम संशोधन मंडळ' हे शब्दसमूह सामासिक आहेत की नाहीत? केवळ त्यातील शब्द सुटे सुटे लिहिले जातात, म्हणून ते सामासिक नाहीत अशा समजुतीने त्यातील 'संस्कृति' व 'निर्मिति' हे शब्द दीर्घान्त लिहिले जातात. माझ्या मते ही गैरसमजूत आहे. वस्तुतः इंग्रजी मजकुराच्या धर्तीवर सिद्ध झालेला हा एक प्रकारचा समासच आहे. फक्त त्यातील सर्व शब्द जोडून लिहिले तर लांबलचक आगगाडी तयार होईल, या कारणास्तव असे शब्द सुटे सुटे लिहिले जातात. पण हाही एक समासच असल्याने त्यातील 'संस्कृति' / 'निर्मिति' ही पदे अविकृत स्वरूपात ऱ्हस्वान्तच लिहावयास हवीत. पण सर्रास दीर्घीकरणाची सवय लागल्याने जेथे विद्वानांना विवेक राहिला नाही तेथे सामान्यांची काय कथा? तसेच तत्सम ऱ्हस्वान्त शब्द एखाद्या शीर्षकात सुटा व एकक स्वरूपात आल्यास तो प्रातिपदिक स्वरूपात लिहिणे योग्य होईल. उदा. विजया राजाध्यक्ष यांचे 'कवितारती' या पुस्तकाचे शीर्षक. गैरसमजुतीने हा शब्द शीर्षकात दीर्घान्त लिहिला गेल्याने एका ग्रंथालय-सेवकाला ही कसली तरी 'आरती' असावी असे वाटले, ही घडलेली सत्यकथा आहे. खरे पाहता तो शब्द 'कविता-रति' अशा तऱ्हेने लिहिला गेला असता तर, कदाचित त्या सेवकाला त्याचा अर्थ कळला नसता, पण निदान त्याचा गैरसमज तरी झाला नसता.

४) नव्या शुद्धलेखन पद्धतीतील दुसऱ्या एका नियमानुसार, संस्कृत व्यंजनान्त (हलन्त) शब्द मराठीत पूर्णाक्षरी म्हणजे स्वरान्त लिहावेत असा फतवा काढला आहे. उदा. 'साक्षात्', 'पृथक्', 'विद्युत्' हे शब्द 'साक्षात', 'पृथक' व 'विद्युत' असे लिहावेत असा नियम केला. याप्रमाणे संस्कृतच्या खुणा पुसल्या तरी, संस्कृतमधून 'साक्षात्कार', 'पृथक्करण' व 'विद्युल्लता' हे सामासिक शब्द जसेच्या तसे उचलले. वस्तुतः नवीन नियमांनुसार हे शब्द 'साक्षातकार', 'पृथककरण', 'विद्युतलता' असे लिहिणे हे तर्काला धरून होईल. पण जिथे तर्क गुंडाळूनच मनमानी फेरबदल करण्यात आले तिथे तर्काची अपेक्षा काय करणार? वरील शब्द तेवढे समासात पूर्वपदी आले असता अर्धाक्षरी का होतात व 'शिक्षण' हा शब्द समासात ('शिक्षणक्षेत्र') आला असता तो अर्धाक्षरी का होत नाही याचा खुलासा संस्कृतचा संदर्भ दिल्याशिवाय होणार नाही. म्हणजे संस्कृतकडून उसनवारी तर करायची, पण तिचे ऋण मानावयाचे नाही, ताक मागायला जायचे, पण भांडे लपवायचे असा हा सगळा दुतोंडी कारभार चालला आहे.

संस्कृतवादी व मराठीवादी विद्वानाच्या मतामतांच्या गलबल्यात शाळांतील शिक्षकांची मात्र कुचंबणा होत आहे. त्यांनी वर्गात शिकवावे कसे? ७ व्या इयत्तेच्या **मराठी व्याकरणाच्या** पुस्तकात 'विद्युल्लता' हा संधी 'विद्युत + लता' अशा प्रकारे फोड करून दाखवला आहे व ते योग्यच आहे. पण इथे 'विद्युत्' हा शब्द व्यंजनान्त का व इतरत्र मात्र तो स्वरान्त का याचा खुलासा कसा करणार? परीक्षेत 'संधी करा' असा प्रश्न टाकायचा झाल्यास तो 'विद्युत् + लता' अशा स्वरूपात द्यावा की 'विद्युत् + लता' असा द्यावा? 'महान', 'विद्वान' व 'समान' हे तीनही शब्द सारख्याच तऱ्हेने लिहावयाचे तर, त्यापासून सिद्ध होणाऱ्या भाववाचक नामांमध्ये फरक का? म्हणजे 'महत्ता' 'विद्वत्ता' हे एकीकडे, तर दुसरीकडे 'समानता' का? 'महानता''विद्वानता' का नको? (अलीकडे 'महानता' हा शब्दही लिखाणात डोकावू लागला आहे.) म्हणजे 'श्वा', 'युवा' आणि 'मघवा' यांची एका सूत्रात गठडी वळण्याचाच हा प्रकार झाला. संस्कृतमधून आलेल्या 'रणजित्', 'इन्द्रजित्' या शब्दांचा अर्थ 'रण जिंकणारा' 'इंद्राला जिंकणारा' असा आहे. मराठीत तो 'रणजित', 'इंद्रजित' असा लिहिल्याने त्याचा अर्थ नेमका उलटा होतो. ('रणात हरलेला', 'इंद्राने जिंकलेला / हरवलेला'). ('रणं जितं येन' असा अर्थ काढायचा तर 'जितेन्द्र' किंवा 'जितेन्द्रिय' या शब्दांच्या चालीवर 'जित' हा शब्द पूर्वपदी आला असता उदा.- 'जितरण). 'पृथक्' शब्द 'पृथक' असा स्वरान्त लिहायचा तर त्यापासून 'पृथगात्मा' याऐवजी 'पृथकात्मा' हा शब्द सिद्ध होणार, 'जगत' वरून जगदीश ऐवजी 'जगतीश' सिद्ध होणार. साहित्य धुरीणांनी शिक्षकांच्या या शंकांना समर्पक उत्तरे द्यावीत. प्रश्न अनुत्तरित ठेवून त्यांना आपली जबाबदारी झटकता येणार नाही अन्यथा हा नियम रद्द करावा.

५)   अलीकडे उच्चाराप्रमाणे लेखन करायचे या नियमाचा अतिरेक होऊ पाहात आहे. त्यानुसार, 'साक्षात्' व 'गवाक्षात' यांच्या उच्चारात फरक नाही व म्हणून ते दोन्ही सारखेच स्वरान्त लिहावेत हा आणखी एक गैरसमज. वस्तुतः 'ती **साक्षात्** समोर उभी होती' व 'ती **गवाक्षात** उभी होती'. या दोन वाक्यातील शब्दांचा अर्थ तर सारखा नाहीच, पण उच्चारही सारखा आहे हे म्हणणे हा एक प्रकारचा भ्रम आहे. 'साक्षात्' हा शब्द व्यंजनान्त स्वरूपात पाहिल्याबरोबर वाचकाचा उच्चार अधिक ठाशीव होतो. व्यक्ती जेव्हा एकमेकांसमक्ष संवाद करतात तेव्हा, त्यांचा आवाज, स्वरातील चढउतार, हावभाव इ. च्या योगे त्यांच्या मनातला अभिप्राय समजू शकतो. पण दूर अंतरावरून एकमेकांशी संवाद साधण्याचे साधन लेखनस्वरूपात असते तेव्हा, ते नेमके अर्थबोधक असावे लागते. कारण अक्षरचिन्हांवरून वाचकाच्या मनात प्रतिमा जाग्या होतात व त्यानुसार अर्थाचे आकलन होते. अर्थभेद दर्शवणारी सुविधा काढून टाकली तर अर्थप्रतीतीही धूसर होण्याची शक्यता असते.

उच्चारानुसार लेखन करावे या आग्रहापोटी अलीकडे 'ब्रह्म' हा शब्द 'म्हैस' या शब्दाच्या पंगतीला बसवून तो 'ब्रम्ह' अशा रूपात रूढ करण्याचा खटाटोप 'महाराष्ट्र टाईम्स' ने चालवला आहे. यामागे मराठी भाषेबद्दलची तळमळ असण्यापेक्षा मराठीवरील संस्कृतचे व पर्यायाने तथाकथित ब्राह्मणी वर्चस्व मोडून काढण्याचा एका अर्थी प्रच्छन्न जातीयवादच आहे. ('महाराष्ट्र टाईम्स' ने आणखी एक 'ब्रह्मघोटाळा' करून ठेवला आहे. अजूनही म. टा. मध्ये हा शब्द कधी 'ब्रम्ह' तर कधी 'ब्रह्म' असा दोन प्रकारे लिहिला जातो. याचा अर्थ 'ब्रह्म' हा शब्द संस्कृतप्रमाणे दाखविण्यास छपाईची अडचण दिसत नाही.) वास्तविक संस्कृतमधून आलेले 'चिह्न', ह्रस्व', 'आह्वान', 'आह्लाद' असे कितीतरी शब्द मराठीत लिहिणे अवघड असल्याने उच्चारानुसार वर्णविपर्यय करून, 'चिन्ह', 'र्‍हस्व', 'आव्हान', आल्हाद' अशा रूपांत रूढ झाले आहेत व ते आता आधुनिक व्यवहारातही वापरावे लागत असल्याने ही तडजोड करण्यास हरकत नाही. पण 'ब्रह्म' या शब्दातील 'ह्म' हे अक्षर लिहिणे फारसे अवघड नाही व या शब्दातील आधुनिक व्यवहाराशी संबंध येणार नसून त्याचा सातत्याने प्राचीन वाङ्मयाशी अनुबंध राखावा लागणार आहे, म्हणून तो 'ब्रह्म' अशा रूपातच कायम ठेवणे इष्ट होईल. (मुंबई विद्यापीठाने अलीकडे प्रकाशित केलेल्या 'ज्ञानदेवी'च्या आवृत्तीत सर्वत्र 'ब्रह्म' असाच शब्द वापरला आहे व 'अर्थात्' सारखे व्यंजनान्त शब्द मूळ संस्कृतप्रमाणेच छापले आहेत ही समाधानाची बाब होय). परंतु अलीकडे प्राचीन काळचा 'देवर्षि' व आधुनिक काळातला खेड्यातला 'देवरुशी' या दोघांना एकाच मापाने तोलण्याचा प्रयत्न चालू आहे. उच्चारानुसारी लेखन हे तत्त्व फार ताणले तर, 'भाषा' हा शब्द मराठी उच्चारानुसार 'भाशा' अशा रूपात लिहिण्याचा दुर्धर प्रसंग ओढवेल. त्याला विद्वानांची तयारी आहे काय? म्हणून याबाबत तारतम्य बाळगावयास हवे. उच्चारानुसारी लेखनाचा अतिरेक केला तर, कोणाचे उच्चार प्रमाण मानावयाचे हा प्रश्न उद्भवतो. उच्चार व्यक्तीगणिक, प्रदेशागणिक व समाजाच्या स्तरागणिक बदलतात.





अनुक्रमणिका

उच्चार वारंवार बदलू शकतात. पण याप्रमाणे लेखनपद्धती वारंवार बदलल्या तर भाषेचा जुन्या वाङ्मयाशी संबंध पुरता तुटेल. भाषेच्या बाबतीत प्रवाहसातत्याचे तत्त्व लागू होते. भाषा ही नदीप्रमाणे सतत वाहत राहते व त्याचवेळी 'नदी' म्हणून एकात्म राहते तसे भाषेचे व्हावयास हवे. मराठीव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रादेशिक भाषेत लेखनपद्धती वारंवार बदलण्याची चळवळ झाल्याचे ऐकिवात नाही. ज्या इंग्रजीचा आदर्श आपण डोळ्यांसमोर ठेवतो तीमध्ये तर, ज्यांचे उच्चार समान पण वर्णलेखन भिन्न अशा शब्दांच्या कितीतरी जोड्या प्रचलित आहेत. उदा Right / Write: तरी उच्चारनुसारी लेखनाचा अतिरेक घातक ठरेल असे मला वाटते.

६) याउलट, मराठी भाषक समाजात तालव्य 'च', 'छ', 'ज', 'झ' आणि दंत-तालव्य 'च़' (चांगला), 'छ़' (उत्सव / उच्छ़व), 'ज़' ('ज़रीकाम'), 'झ़' ('झ़ाडू') यांमध्ये भाषेत उच्चारभेद असूनही यासाठी स्वतंत्र चिन्हे नाहीत, ती असण्याची जरुरी आहे. पण हा प्रश्न उपेक्षित राहिलेला आहे.

७) मराठी शुद्धलेखन - नियमांमध्ये व इतर व्याकरण-पुस्तकांत 'तत्सम' शब्दांची चर्चा आढळते. आतापर्यंत 'तत्सम' याचा अर्थ 'संस्कृत' मधून मराठीत जसाच्या तसा आलेला शब्द असा मानला गेला आहे. परंतु आधुनिक काळात इतर भाषांशी संपर्क आल्याने त्या भाषांतूनही काही शब्द मराठीत अविकृत स्वरूपात आले आहेत. उदा. 'टीप' (मूळ हिंदी) किंवा 'अपील' (मूळ इंग्रजी), अशा शब्दांची सामान्यरूपे करताना, शुद्धलेखन-नियमावलीतील ८ वा नियम लावावा की नाही? म्हणजे 'टिपा' की 'टीपा'? 'अपिलात' की 'अपीलात'? याचा खुलासा व्हावयास हवा आणि जर तो लावावा असे ठरले तर, 'तत्सम' शब्दाची व्याख्या व्यापक करावी लागेल व तीत इंग्रजी-हिंदीसुद्धा कोणत्याही परकीय भाषेतून आलेल्या शब्दांचा अंतर्भाव करावा लागेल.

८) मराठीत काही ठिकाणी दोन महाप्राण व्यंजने एकत्र येऊन जोडाक्षरे बनली आहेत. पण त्यांचे लेखन वेगवेगळ्या प्रकारे केले जाते, त्यांमध्ये एकरूपता नाही. उदा. 'बुध्+धि = बुद्+धि = बुद्धि', 'उत्थान' हा शब्दही त्याच प्रकारे लिहितात. पण 'कथ्थक', 'विठ्ठल', 'सख्खा', 'चिठ्ठी' या शब्दांमध्ये हे तत्त्व पाळले जात नाही. वस्तुतः भाषाशास्त्रानुसार दोन महाप्राण उच्चार एकत्र नांदू शकत नाहीत, पहिले महाप्राण व्यंजन अल्पप्राण होते. हिंदी भाषेत या तत्त्वानुसार 'चिट्ठी' असे लिहितात. मराठी भाषकांनीही हे शास्त्रीय तत्त्व सर्वत्र स्वीकारावे म्हणजे वरील शब्द 'कत्थक', 'विट्ठल', 'सक्खा', 'चिट्ठी' याप्रमाणे लिहिता येतील.

९) पाठ्यपुस्तकातील जोडाक्षर-लेखनासंबंधी अलीकडेच 'भाषा आणि जीवन' मध्ये मी एक लेख लिहिलेला आहे. (वर्ष १२ : अंक १ : हिवाळा १९९४) त्यामुळे या विषयासंबंधी अधिक विस्ताराने लिहिण्याची जरुरी नाही. परंतु त्यामध्ये मी रूढ जोडाक्षर-लेखनाचे जे फायदे नमूद केले होते त्यांव्यतिरिक्त 'अर्थभेदा' चा आणखी एक मुद्दा संभवतो.

'शुद्ध' हा शब्द 'शुद्ध' असा लिहिला काय नि 'शुद्ध' असा लिहिला काय, त्याच्या उच्चारात वा अर्थात फरक पडत नाही. पण काही जोडाक्षरांच्या बाबतीत – विशेषतः अन्ती 'य्' असलेल्या जोडाक्षरांच्या बाबतीत मात्र एक अडचण येते. 'उद्यान' हा शब्द 'उद्‌यान' अशा प्रकारे लिहिल्यास, उच्चार करताना शब्दाचे 'उद्' व 'यान' असे दोन भाग पडतात व त्याचा अर्थ 'वर जाणारे वाहन / यान' असा होऊ शकतो. परंतु तोच शब्द 'उद्यान' अशा रूपात लिहिल्यास, 'द्' व 'य' यांचा उच्चार एकात्म होऊन 'बाग' असा अर्थबोध होतो. 'सद्विवेक' व 'अद्वितीय' या शब्दांमध्ये 'द्वि' हे जोडाक्षर समान दिसत असले तरी, त्यांतील 'द्' आणि 'व' या व्यंजनांची भूमिका अर्थदृष्ट्या वेगवेगळी आहे. 'सद्विवेक' शब्दात 'सद्+विवेक' हे घटक असून 'द्' हे व्यंजन पहिल्या घटकाशी संबंधित आहे. त्यामुळे हा शब्द नवीन पद्धतीप्रमाणे 'सद्‌विवेक' अशा प्रकारे लिहिला तरी अर्थात फ़रक पडत नाही. पण 'अद्वितीय' शब्दात 'अ+द्वितीय' हे दोन घटक असून, 'द्' हे व्यंजन दुसऱ्या घटकाशी संबंधित आहे. त्यामुळे त्याची फोड करताना 'अद् + वितीय' असे लिहिणे योग्य होणार नाही. म्हणून मराठी भाषेने हा जोडाक्षरांचा वारसा गमावू नये. शक्य तेथवर जोड-पद्धतीची रूढ जोडाक्षरे लिहावीत व अर्थभेद दर्शवण्यासाठी आवश्यक असेल किंवा यंत्राच्या दृष्टीने गैरसोयीचे असेल तेथेच ती तुटक पद्धतीने लिहावीत. तज्ज्ञ मंडळींनी या विषयावर सांगोपांग चर्चा करून पाठ्यपुस्तक मंडळाला हे धोरण सोडून देण्यास भाग पाडावे. कारण नवीन पद्धतीमुळे आपण भावी पिढीचे खूप नुकसान करीत आहोत.

'भाषा आणि जीवन'च्या व्यासपीठासमोर मी हे प्रश्न मांडले आहेत. या अनुषंगाने वाचकांपैकी इतर कोणाला अन्य मुद्दे सुचल्यास त्यांनीही ते मुद्दे मांडावेत, त्यांची 'भाषा आणि जीवन' मधून चर्चा व्हावी. माझी अशीही सूचना आहे की, साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षांच्या संमतीने एक तज्ज्ञ-समिती नेमून, अशा प्रश्नांचा सुजाणपणे निकाल लावावा व या क्षेत्रातील अराजक गोंधळ दूर करावे. जर साहित्यिक विद्वानांनी हे मनावर घेतले नाही तर, जाणत्या, सुबुद्ध मंडळींनी आपल्या विवेकबुद्धीला स्मरून लेखन करावे. गो. नी. दांडेकर यांच्यासारख्या ख्यातनाम साहित्यिकाने जुने शुद्धलेखन सोडलेले नाही. डॉ. अशोक केळकर यांच्यासारख्या नामवंत भाषशास्त्रज्ञाने 'वैखरी' हे पुस्तक पूर्णपणे जुन्या शुद्धलेखन-पद्धतीनुसार लिहिले आहे. ही उदाहरणे लक्षात घेऊन, आपणही जेथे जेथे अन्याय्य, तर्कदुष्ट नियम असेल तेथे, गांधीजींच्या शिकवणीनुसार 'सविनय कायदेभंग करावा' असे माझे आवाहन आहे.

**एम् ३/१, हीरामणि रतन सोसायटी, बांगुरनगर, म. गांधी मार्ग, गोरेगाव (पश्चिम), मुंबई - ४०० ०९०.**
**दूरध्वनी : ८७३२४५१**







अनुक्रमणिका

# झापडबंद दृष्टिकोण नको !

**– गं. ना. जोगळेकर**

श्रीमती सत्त्वशीला सामंत यांनी मराठीतील लेखन-नियमांच्या संदर्भात उपस्थित केलेले प्रश्न तसे नेहमीचेच आहेत. असे प्रश्न विचारण्यामागे असलेली भूमिकाही परंपरागतच आहे. संस्कृतचे ऋण घेऊन अनेक वर्तमान भारतीय भाषा निर्माण झाल्या, त्याप्रमाणे 'मुळात संस्कृतसाठी असलेली' देवनागरी लिपी हिन्दी, मराठी, सिंधी यांसारख्या भाषांनीही स्वीकारली असल्यामुळे या भाषांनी सर्व बाबतींत संस्कृतची मर्जी राखून, निदान तिला न दुखवता जमेल तसा आपला व्यवहार केला पाहिजे अशी गर्भित सूचना असे प्रश्न विचारण्यामागे असते.

प्रत्येक भाषेची उच्चारणपद्धती वेगळी असते, तिला जास्तीत जास्त सुसंगत अशी तिची लेखनपद्धती असली पाहिजे. मराठी लेखन करताना व्युत्पत्ती लक्षात घ्यावी, संस्कृत दृष्ट्या अर्थाचा अनर्थ होऊ नये म्हणून जपावे अशा अपेक्षा बाळगणे मुळातच चुकीचे आहे. तेव्हा भाषातज्ञांनी ('तज्ज्ञांनी' नव्हे !) वास्तवाचे भान ठेवून या गोष्टीकडे लक्ष पुरविले तरच काही मार्ग निघू शकेल. तूर्त श्रीमती सामंत यांना पाहिजे असलेली उत्तरे (माझ्यापुरती) अशी :

१) १९६२ साली 'टंकलेखन यंत्रांची सोय पाहण्यासाठी नवे शुद्धलेखन-नियम अस्तित्वात आले' असे म्हणणे भ्रामक आहे. मराठी लेखनातील अनावश्यक अनुस्वारांची गर्दी नाहीशी करण्याचा विचार १८९६ पासून (म्हणजे जवळपास शंभर वर्षे) मांडला जात होता. १९०४, १९२८, १९३५ व १९६२ या टप्प्यांनी शेवटी या निर्णयापर्यंत येता आले, हे मराठी शुद्धलेखनाचा इतिहास पाहिल्यास सहज लक्षात येईल.

२) 'भेददर्शक अनुस्वारांचीही गच्छन्ती झाली' ही ठराविक निरर्थक ओरड करण्याचे वस्तुतः कारण नाही. 'नावात काय आहे?' असे म्हणताच ज्यांच्या मनात 'होडीबद्दल' विचारले, असे येत असेल (कारण 'ना' वरचा अनुस्वार दिला नाही !) किंवा पाच पेच म्हणताच ज्यांना एका रत्नाचा उल्लेख केला असे वाटत असेल त्यांना 'मराठी नावाची एक स्वतंत्र भाषा आहे' याचेच काही देणे घेणे नाही असे म्हटले पाहिजे.

३) कवी, शिशू, नीती, क्रांती अशा शेकडो शब्दांचे उच्चार मराठीत दीर्घच होत असतात. 'त्यांचे मूळ संस्कृत रूप ऱ्हस्वांत आहे म्हणून समासात पूर्वपदी हे शब्द आले की ऱ्हस्व होतात' या नियमाची शब्दयोजना चुकीची आहे. कविसंमेलन, शिशुविकास, नीतितत्त्व, क्रांतिवीर अशा शब्दांच्या उच्चारणात ऱ्हस्वत्व येते म्हणून हे शब्द 'कविसंमेलन' असे लिहायचे असे म्हटले पाहिजे. कारण एकच शब्द कधी दीर्घ तर कधी ऱ्हस्व असा

उच्चारण्याची मराठीची वृत्ती आहे. उदा. : सासू – सासुरवास, स्त्री – स्त्रिया, माणूस – माणुसकी, नवीन – नाविन्य, वडील – वडिलांना इ. तेव्हा मुलांना शिकवताना 'संस्कृतमध्ये असे आहे म्हणून' हे कारण न देता 'एकाच शब्दाचा मराठीत स्थानपरत्वे वेगवेगळा उच्चार होतो म्हणून तेथे ऱ्हस्व किंवा दीर्घ लिहायचे' हे कारण सांगितले पाहिजे.

४) गेली तीस वर्षे संस्कृतचे अध्ययन शालेय अभ्यासक्रमात फारसे होत नाही. अभ्यासक्रमात विषय आहे, पण अध्यापनाची व्यवस्था होत नाही म्हणून फारच थोड्या शाळांमधून हा विषय उरला आहे. हाच क्रम यापुढेही चालू राहणार हे जुन्या पठडीतल्या शिक्षकांनी ओळखले नाही तर त्यांच्या संस्कृतनिष्ठ मनाला मराठीचा जाच होत राहणार यात शंका नाही.

५) '१९७३ च्या शासन-व्यवहार कोशा नंतर महत्त्वाचा असा कोणताही कोश प्रसिद्ध झाला नाही' हे विधान चुकीचे आहे. कारण डॉ. द. ह. अग्निहोत्री यांचा 'अभिनव मराठी कोश' हा पाच खंडांचा (व्हीनस प्रकाशन, पुणे) कोश १९८५ मध्ये प्रकाशित झाला आहे. मराठी शब्दांचे उच्चारण कसे होते ते दाखविण्याचा प्रयत्न प्रथमच या कोशाने केला आहे. कवि, भीति, प्रीति, गुरु, धेनु हे शब्द परंपरागत रीतीने ऱ्हस्वान्त देऊन त्यांचे उच्चारण प्रीती, भीती, कवी, गुरू, धेनू असे दीर्घान्त होते असे या कोशात स्पष्टपणे म्हटले आहे, साहित्य-संस्कृती मंडळाचा कोश प्रकाशित व्हायचा असल्याने त्यातील भूमिकेची मला कल्पना नाही. शब्दाचे मूळरूप (भीती, गुरू इ.) मराठीत दीर्घ दाखविणेच योग्य आहे. मात्र सामाजिक शब्दांच्या बाबतीत 'संस्कृतानुसार' असे न म्हणता 'मराठीत येथे असा उच्चार होतो म्हणून' असे स्पष्टीकरण दिले पाहिजे. अर्थात हा कोश मुद्रणावस्थेत जाईल तेव्हाच योग्य ते मत व्यक्त करता येईल. 'यापुढे कोशकारांनी वास्तवावर आधारलेली भूमिका घ्यावी' असे मात्र म्हणता येईल.

६) देवनागरीमधील मराठी कोशात 'विशिष्ट शब्दाचा अर्थ काय दिला आहे' ते पाहणे महत्त्वाचे असते. इंग्रजीमध्ये मात्र शब्दाचा अर्थ आणि अक्षरक्रम (स्पेलिंग) या दोन्ही बाबी पाहाव्या लागतात. मराठीत मोल्स्वर्थ, दाते-कर्वे इत्यादी कोशकारांनी त्यांच्या काळात शब्दांचे लेखन जसे रूढ होते तसे केले. या कोशांची फक्त पुनर्मुद्रणे झाली, नव्याने रचना झाली नाही. त्यामुळे आज हे कोश अर्थ पाहण्यासाठीच वापरावे लागतात. एकाच मराठी शब्दाचे लेखन अनेकवचन, सामान्यरूप, साधित शब्द यांसारख्या कारणांमुळे भिन्न प्रकारे होत असते याची जाणीव ठेवल्यास 'अमूक शब्द कोशात कसा लिहिला आहे' हे एकमेव प्रमाण मानण्याचे कारण नाही.

७) 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ' तसेच, 'पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ' किंवा 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन' यां सारख्या अनेक शब्दमालिका संस्थांची नावे म्हणून वापरल्या जातात. हे इंग्रजीच्या अनुकरणाने होत आहे हे उघड आहे. पण यासाठी यांना समास मानून विशिष्ट लेखनाचा आग्रह

बाळगण्याचे कारण नाही. एकतर विशेषनाम कसे वापरायचे हे स्वातंत्र्य त्या व्यक्तीला / संस्थेला असते हे मान्य केले पाहिजे. दुसरे म्हणजे व्यवहारात (पुन्हा इंग्रजीच्या अनुकरणाने) 'म.रा.सा.सं.मं.' असा संक्षेप करून ही संस्थानामे योजली जातात. तेव्हा समास ही संकल्पना तारतम्यानेच वापरली पाहिजे.

८) 'कवितारती' या शीर्षकामुळे एका ग्रंथालय सेवकाला ही कसली तरी 'आरती' असावी असे वाटले असणे शक्य आहे. दुसऱ्या कुणाला 'पंचारती' म्हटल्यावर पंचा आणि रती यांचा हा द्वंद्व समास असावा असेही वाटू शकेल ! नाही तरी, पूर्वी 'काश्मिरी गुलाब' आणि 'हिरवा चाफा' ही वनस्पती-शास्त्रावरची पुस्तके असावीत असे तेव्हाच्या सेवकांना वाटले होतेच. अशा सेवकांचे प्रशिक्षण करणे हा यावर उपाय आहे. (मराठीत अज्ञानमूलक शब्दनिष्ठ विनोदाला तोटा नाही. लहानपणी 'लेंगे स्वराज्य लेंगे' हे गाणे म्हणताना स्वराज्याचा आणि लेंग्याचा संबंध फार दृढ आहे असे आपल्याला वाटत होते असे जयवंत दळवींनी म्हटले आहे !)

९) परिषद, विद्वान, साक्षात, पृथक, विद्युत हे शद्ब मराठीत पूर्णाक्षरी लिहिण्याने काही अनर्थ ओढवणार नाही. साक्षात्कार, पृथक्करण, विद्युल्लता हे काही मराठीत वारंवार वापरले जाणारे शब्द नव्हेत. ज्यावेळी हे शब्द विद्यार्थ्यांच्या परिचयाचे होतील त्यावेळी त्यांचे उच्चारण असे का होते हे त्यांना समजावून सांगता येईल. ज्यांना आपण अकारान्त शब्द म्हणतो त्यांचे उच्चारण नीट ऐकले तर त्यातील बहुतेक कमी-अधिक प्रमाणात व्यंजनान्तच उच्चारले जात असतात, हे कळेल. राम, वेळ, खूप, नीज अशा अनेक शब्दांचे उच्चारण लक्षपूर्वक ऐकल्यास याची प्रचीती येईल. त्यामुळे या शब्दांना एक न्याय व दुसऱ्या शब्दांना दुसरा असे करण्याचे कारण नाही. आपण भाषा कानांनी ऐकण्यापेक्षा डोळ्यांनी पाहण्यावर भर देत असल्यामुळे 'तर्क गुंडाळून मनमानी' कोण करते ते सहज स्पष्ट होईल.

१०) 'ती गवाक्षात उभी होती' यातील 'गवाक्षात' चा अर्थ माहीत असणाऱ्याला 'साक्षात' म्हणजे काय हे माहीत असायला हरकत नाही. पण असे असूनही 'साक्षात' असेच लेखन करण्याचा आग्रह असेल तर तेथेच थांबून चालणार नाही. तर "ती 'साक्षादुभी' होती किंवा ती 'साक्षात्समोर' उभी होती" असे लिहिण्याची तयारी ठेवली पाहिजे, कारण संधी होण्यासारखे घटक जवळ आले असूनही संधी केला नाही, तर संस्कृतचा अनादर केल्यासारखे नाही का होणार? तेव्हा 'शांत पापम्' म्हणण्याची पाळी येण्यापेक्षा भांडे मिरवीत नेऊन आणि पुकारा करून ताक मागावे हे बरे !

११) एखाद्या शब्दापासून भाववाचक नामे बनविण्याचे प्रत्येक भाषेत काही संकेत असतात. तसे मराठीतही आहेत. 'महत्' पासून महत्त्व, महत्ता, महती ही भाववाचक नामे होतात, (अर्थदृष्ट्या त्यांच्या उपयोजनात फरक आहे.) 'विद्वान' हा शब्द नाम म्हणूनच अधिक प्रचारात आहे. त्यामुळे त्याचे भाववाचक नाम प्रचारात नाही. विद्वान हे विशेषणही आहे. (उदा. : विद्वान वक्ता) या संदर्भात विद्वानपण / पणा ही रूपे केली

जातात. समान-समानता याप्रमाणे महान-महानता ही रूपे करण्यात काही गैर नाही. आता कुणी 'विद्वानता' असे रूप वापरले आणि ते रूढ झाले तर तेही स्वीकारावे लागेल. रूपदृष्ट्या 'श्वा, युवा, मघवा' हे शब्द सारखे असल्याने ते एका गटाचे म्हणून स्वीकारवेच लागतात. त्यांचे अर्थ फार भिन्न आहेत म्हणून लाक्षणिक पद्धतीनेच विनोदासाठी ही त्रयी वापरली जाते. यापलीकडे यास महत्त्व नाही.

१२) इंद्रजित, रणजित, इत्यादी शब्द मराठीत विशेषनामे म्हणून येतात. विशेषनामांचा अर्थ पाहायचा नसतो हे सर्वमान्य तत्त्व आहे. इकडे दुर्लक्ष केल्यास वाटेल तो घोळ घालता येईल. या शब्दांचे लेखन कसे करायचे हे पाहायचे असेल तर व्युत्पत्ती पाहण्याचे कारण नाही. जर या शब्दांचे उच्चारण इंद्रजीत, रणजीत असे होत असेल तर लेखनही त्यास अनुसरूनच केले पाहिजे. जगदीश, पृथगात्मता हे शब्द कसे बनले (व्युत्पत्तीच्या दृष्टीने) हे सांगणे वेगळे आणि मराठी शब्द म्हणून ते कसे लिहायचे हे सांगणे वेगळे. त्यांची गल्लत करून चालणार नाही.

१३) ब्रम्ह आणि म्हैस यांबद्दल अनेकजण विनाकारण हळवे बनतात. चिन्ह, ऱ्हस्व, आव्हान ही तडजोड चालते. (वस्तुतः ती तडजोड नाही. मराठीत उच्चारणच तसे होते.) प्राचीन वाङ्मयाशी अनुबंध राखणाऱ्यांना ब्रह्म म्हणजेच ब्रम्ह हे सहज कळेल. एकोणिसाव्या शतकात दादोबांसारख्यांनी आह्मी, ह्मणजे, ह्मणून अशी रूपे वापरली आहेत. ती रूपे समजून घेता येतात मग 'ब्रम्ह' म्हणताच 'अब्रह्मण्यम्' (की 'सुब्रह्मण्यम्'?) असे का वाटते?

१४) मराठीने मूर्धन्य 'ष' हा (मंगरूळकरी) उच्चार गमावला आहे. मराठीत 'श' आणि 'स' अशी या गटातली दोनच व्यंजने आहेत हे डॉ. कालेलकरांनी चाळीस वर्षांपूर्वी सांगितले. 'भाषा' असे लिहिले तरी 'भाशा' असेच उच्चारण होते, पण 'ष' हे अक्षर उपलब्ध असल्यामुळे वेगळा उच्चारही आहेच, असा बहुतेकांचा गैरसमज होतो, तो दूर करणे आवश्यक आहे. उच्चार एकच आहे, लेखन चिन्हे मात्र दोन उपलब्ध आहेत असेच या 'ष' – 'श' च्या बाबतीत मानले पाहिजे. 'भाषा' ऐवजी 'भाशा' असे लिहिलेले (सवय नसल्यामुळे) डोळ्यांना खटकेल, पण कानांना मात्र त्यात काही गैर वाटणार नाही. दोन भिन्न उच्चार असूनही एकच लेखन-चिन्ह हा प्रकार (चहा-चमचा, जगात-जगायचे इ.) मराठीने स्वीकारला आहे, त्याच्या उलट, उच्चार एक पण चिन्हे दोन अशी या 'ष–श'ची स्थिती आहे. ऋषी आणि रुशी हे मराठीत उच्चारतः सारखेच असल्यामुळे लेखनातही सारखेपणा असायला हरकत नाही. पण देवर्षींच्या शापवाणीचा धाक सतत बाळगणाऱ्यांनी देवरुशी हाही अटळ असा समाजघटक आहे, त्याला डावलता येणार नाही हे ओळखले पाहिजे !

१५) 'कोणाचे उच्चार प्रमाण मानावयाचे?' असा प्रश्न या संदर्भात नेहमी विचारला जातो. त्याला उत्तर असे की, आजवर ज्यांचे उच्चार प्रमाण मानले गेले त्यांचेच उच्चार

प्रमाण मानायचे. शिक्षण, शासन, न्याय व्यवस्था, संस्कृती, प्रसारमाध्यमे, ग्रंथ-व्यवहार या क्षेत्रातील व्यक्तींनाच प्राधान्याने लेखन व्यवहार करावा लागतो. व्यक्तिगत पातळीवर लेखन करताना उद्दिष्ट मर्यादित असते, त्यामुळे लेखनाबाबतचे धोरण तेथे शिथिल असू शकते. पण लेखन सार्वजनिक स्वरूपाचे करायचे असल्यास नियमांचे पालन करणे हितावह असते. पूर्वी या क्षेत्रात वावरणारा वर्ग अगदी मर्यादित होता त्यामुळे लेखननियमांचे पालन काटेकोर रीतीने होत असे. आता शिक्षणाच्या प्रसारामुळे लेखनव्यवहार करणारा वर्ग मोठ्या प्रमाणात वाढला आहे. त्याचा सामाजिक स्तरही बदलला आहे. त्यामुळे लेखनाबाबत पूर्वीची पंतोजी वृत्ती आता टिकू शकणार नाही. आज मराठी भाषा संस्कृतच्या प्रभावाखाली नसून तिच्यावर इंग्रजी आणि हिन्दीचे वर्चस्व वाढत आहे. हे नवीन आक्रमण कसे परतवायचे याचा आता विचार केला पाहिजे. त्यामुळे केवळ 'संस्कृतज्ञ' अशा मर्यादित वर्गाऐवजी सर्वसाधारण सुशिक्षित आणि सार्वजनिक स्वरूपाचा लेखनव्यवहार करणारा वर्गच प्रधान मानून त्याचे उच्चारच प्रमाण म्हणून स्वीकारले पाहिजेत.

१६) अन्य भारतीय भाषांनी लेखन नियमांत बदल केले असतील किंवा नसतील. गेल्या सव्वाशे वर्षांपासून मराठी अभ्यासकांनी लेखन नियमांबाबत सतत जागरूकता दाखविली आहे. त्यामुळे तर मुंबई विद्यापीठ, महाराष्ट्र साहित्य परिषद, विदर्भ साहित्य संघ यांनी सामुदायिक रीत्या काही बदलाचे प्रयत्न केले. महामंडळाने केलेले व शासनाने स्वीकारलेले लेखनाचे नियम हे स्थित्यंतराचेच फलित आहे. (असे काही अन्य भाषांमध्ये घडल्याचेही ऐकिवात नाही.) बोलल्याप्रमाणे शंभर टक्के लिहिता येणार नाही हे सर्वांनाच मान्य आहे. पण परिस्थितीनुसार बदलत्या उच्चारणाला लेखनाने शक्य तेवढे अनुसरले पाहिजे. तरच बोलणे आणि लिहिणे यांत काही संगती राहील. 'ज्या काळात जे प्रचारात असते ते शुद्धच असते' हे मोरो केशव दामले यांचे ९० वर्षांपूर्वीचे विधान आजही तितकेच मार्गदर्शक आहे.

१७) श्रीमती सामंत मराठीच्या हितासाठीच धडपड करीत आहेत, यात शंका नाही. त्यांची अभ्यासू वृत्ती यापूर्वीही दिसून आली आहे. भाषेचे स्थैर्य, सातत्य, विकास याची त्यांच्याप्रमाणे इतरांनाही काळजी आहे. त्यांनी उपस्थित केलेल्या बारीकसारीक शंकांबद्दल उत्तरे निश्चितच देता येतील. त्यांनी आपल्या टिपणात खोचक आणि आक्रमक भाषा वापरल्यामुळे त्याच पद्धतीने उत्तर देणे भाग पडले. यात त्यांच्याबद्दल अनादराची भावना यत्किंचितही नाही. त्यांनी, 'सविनय कायदेभंग' करायला सांगितले आहे ते योग्यच आहे. पण 'कायदा पाळा गतीचा, काळ मागे लागला, थांबला तो संपला' हेही तितकेच विचारात घेतले पाहिजे. भाषेकडे डोळे (आणि कान) उघडे ठेवून जे पाहतात त्यांनाच हे आवाहन पोचेल. एरवी इतरांच्या बाबतीत 'व्याजनिद्रितस्य जागृतिः असंभवा' (म्हणजे झोपेचे सोंग घेणाऱ्याला जागे कसे करणार?) न्यायच लागू पडतो. दुसरे काय?

**मराठी विभाग, फर्गसन महाविद्यालय, पुणे - ४११ ००४.**





अनुक्रमणिका

**ज्याची त्याची प्रचीती**

# भाषिक चिन्हांचा काव्यात्म उपयोग

**– नीलिमा गुंडी**

कवितामध्ये शब्दांच्या ध्वनिरूपातून म्हणजे नादातून अर्थाकडे घरंगळत केलेला प्रवास अनेकदा आढळतो. त्यामानाने शब्दांच्या दृश्यरूपातून म्हणजे भाषिक चिन्हातून अर्थाकडे केलेला प्रवास क्वचित आढळतो. विंदा करंदीकरांच्या कवितांमध्ये अशा दोन जागा आढळल्यामुळे त्यांच्याकडे लक्ष वेधावेसे वाटले.

१) करंदीकरांच्या 'धृपद' (पॉप्युलर बुक डेपो, मुंबई, १९५९) या काव्यसंग्रहातील 'आततायी अभंगां' मध्ये पुढील ओळ दोन ठिकाणी (पृ. ९८ व पृ. १२१) आली आहे. "'मी' च्या वेलांटीचा । सुटो सुटो फांस".

येथे 'मी' या शब्दाचे दृश्यरूप महत्त्वाचे आहे. त्यातील वेलांटीच्या गोलाकारात कवीने फासाची प्रतिमा कल्पिली आहे. 'मी' ची स्वार्थातून – संकुचितपणातून – सुटका व्हावी; हा व्यापक आशय सूचित करण्यासाठी वेलांटीच्या चिन्हाला प्रतिमारूप दिले गेले आहे. यातून व्यक्त झालेली जाणीव अभंग छंदाशी परंपरेने निगडित अशी असली तरी तिला मिळालेली अभिव्यक्ती असांकेतिक आहे.

२) करंदीकरांच्या 'हिमयोग' ('संहिता' : संपा. मंगेश पाडगावकर, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, १९७५, पृ. १४०-१४२) या कवितेतील शेवटच्या सुनीतातही अक्षरचिन्हाचा असा जिवंतपणे वापर केलेला दिसतो.

विश्वात एकावेळी घडणाऱ्या वरवर असंबद्ध वाटणाऱ्या अनेकविध घटनांचा संबंध शोधण्याचा प्रयत्न या कवितेत आहे. साध्याशा चुकीतून घडलेला भव्य जीवनार्थाचा साक्षात्कार; हा कवितेचा आशय आहे. तो व्यक्त करताना ओळी येतात :

"टाईपरायटरवर तीच चूक झाली तिसऱ्यांदा आणि 'ए' ला गचांडी देऊन तिथे शिरला एक 'ओ', विस्फारलेल्या डोळ्याएवढा".

येथे 'एकोऽहं' म्हणणारा 'बहुस्याम्' झाला असेल, हा विश्वाच्या उत्पत्तीबाबतचा तर्क त्या साध्या टायपिंग करताना होणाऱ्या चुकीमुळे कविमनात उलगडत जातो आणि त्या अनुभवामुळे दाटून आलेला विस्मयाचा भाव 'ओ' हे इंग्रजी अक्षरचिन्हच जणू व्यक्त करते – 'ओ' चा वर्तुळाकार साहजिकच प्रतिमारूप होऊन येतो.

एखादा जातिवंत कवी अभिव्यक्तीच्या संदर्भात भाषेचा कस प्राथमिक पातळीवरही कितीप्रकारे पणाला लावतो, याचा प्रत्यय अशा ठिकाणी येतो.

**६/७०, लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे - ४११ ०३०.**



# लहान आणि मोटे

– वर्षा सहस्रबुद्धे

नारळकर फौंडेशनच्या 'अक्षर-नंदन' बालवाडीत सहज-शिक्षणावर भर आहे. खेळांतून, गाण्या-गोष्टींतून, मातीकामातून, सहलींमधून मुलांनी शिकावं असं वातावरण निर्माण करण्याचा आमचा प्रयत्न आहे. काही संकल्पांसाठी छोटे छोटे पाठही घेतले जातात. त्या पाठांविषयी आम्ही शिक्षिका आपसात बोलत होतो.

पाठ घेण्याविषयीची ताईंची तीव्र इच्छा जाणून मी म्हटलं, 'आपण पाठांचं ठरवू. तुम्ही विषय सुचवण्यात पुढाकार घ्या'.

ताईंनी चटदिशी दोन-तीन विषय सुचवले. त्यांपैकी एक होता, 'लहान-मोठे'. पाठाच्या अध्यापन पद्धतीविषयी मोघम बोलणे झाले ते असे : काही लहान काही मोठ्या वस्तू घ्याव्यात. त्यांच्या आधारानं पाठ घ्यावा. हा पाठ प्रामुख्यानं विज्ञानाचा म्हणून घेता येईल.

नंतर कित्येक दिवस माझ्या मनात तो विषय घोळतो आहे. पाठ पुढे ढकलला आणि ठरवलं की छोटंसं टिपणच करायला हवं.

मनात आलं, मराठीत मोठे / मोठी / मोठा आपण कुठे कुठे वापरतो ? कसं वापरतो ?

मोठा डबा आणि छोटा डबा → इथे आकारमानासाठी. मोठी रेघ-छोटी रेघ, मोठी रांग-छोटी रांग, मोठी पेन्सिल-छोटी पेन्सिल → इथे लांबीसाठी. मोठा आवाज-बारीक आवाज → इथे ध्वनीच्या तीव्रतेसाठी. मोठं माणूस-लहान मूल → वयासाठी. मोठी खोली-छोटी खोली → क्षेत्रफळ आणि अवकाशासाठी. मोठं झाड-छोटं झुडूप → विस्तार आणि उंचीसाठी. मोठी व्यक्ती → थोर या अर्थानं. मोठी शाळा (आता ती मोठ्या शाळेत जाते !) → वरची पातळी दर्शवण्यासाठी. मोठ्या वर्गात (खूप विद्यार्थी असलेल्या वर्गात) → संख्येसाठी. (तेथे मोठ्या संख्येने लोक उपस्थित होते / पटांगणावर मोठी सभा झाली). मोठा पाऊस → (याला काय म्हणायचं ? पावसाच्या तीव्रतेसाठी ?)

याखेरीज क्रियाविशेषण म्हणून किंवा वाक्प्रचारातही 'मोठं' येतं ! मोठं होणं, मोठ्यानं बोलणं, डोळे मोठे करणं... वगैरे. मुलांना दिल्या जाणाऱ्या कारणांमध्ये 'मी मोठाय् ना म्हणून' - किंवा 'तू लहान आहेस ना म्हणून' - हे जेव्हा येतं तेव्हा वय सूचित करणं एवढ्या मर्यादित अर्थानं ते नक्कीच नसतं. आपल्या संस्कृतीतला मोठ्यांविषयीचा आदरभाव जसा त्यात आहे, तसा वयाचा दबाव निर्माण करून मुलांना निःप्रश्न करणाऱ्या 'गप्प बस' संस्कृतीचाही वास त्याला आहे.

शिवाय बिरबलाची गोष्ट आठवली. लहान-मोठ्या रेघांची. संदर्भचौकटीतच लहानमोठं ठरवणं शक्य आहे याची आठवण करून देणारी.

सुमारे चार वर्षे वयाच्या मुलांना भाषेचा खूप चांगला अंदाज आणि आवाका आलेला असतो. नवनवे शब्द, रचना, अर्थच्छटा चटचट आत्मसात करण्यासाठी, वापरून पाहण्यासाठीचा दुर्दम्य उत्साह त्यांच्या ठिकाणी असतो. असं असताना फक्त काही लहानमोठ्या वस्तू आणून पाठ पुरा होऊच शकणार नाही. या टिपणातल्या सगळ्याच्या सगळ्या अर्थांविषयी बालवाडीत बोलणं अवघड आहे. पण बालवाडीच्या पातळीवरही ताई म्हणून मला आकारमानाच्या जोडीला आणखीही अर्थसंदर्भांचा विचार करायलाच हवा. क्षेत्रफळ, ध्वनीची तीव्रता, लांबी, वय, उंची, वाढ वगैरे संदर्भातला 'मोठं' चा वापर मी जाणीवपूर्वक करायला हवा. एका शब्दाकडे किती तऱ्हांनी बघता येतं याचं बीज मुलांच्या मनात रुजायला कदाचित यामुळे मदत होऊ शकेल.

बालवाडीपासूनच काही संकल्पना, घटना याविषयी फार ढोबळपणानं बोलल्यानं एका गोष्टीकडे अनेक अंगांनी बघण्याची दृष्टी मुलांमध्ये वाढीला लागण्याची प्रक्रियाच सुरू होत नाही की काय? विद्यापीठ-स्तरांवरही विख्यात वाङ्मयकृतींचं इतरांनीच केलेलं समीक्षण टेकू म्हणून विद्यार्थी वापरतात, स्वयंस्फूर्त आणि संतुलित संशोधनात आपले विद्यार्थी मागे राहतात याचा संबंध ती प्रक्रिया सुरू होण्याशी असेल का? थोडक्यात, 'मोठेपणी' काही 'मोठं' काम लोकांनी करावं असं वाटत असेल तर 'लहान' शाळांमधले शिक्षक खूपच संवेदनाशील, जागरूक आणि सक्षम असायला हवेत.

टिपण छोटंसं म्हणता म्हणता बरंच मोठं झालं !

**१२९४ शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे - २.**



# शब्दसृष्टी, ईश्वर आणि रूमी

**प्रस्तावक आणि अनुवादक — विद्युल्लेखा अकलूजकर**

जलालुद्दीन रूमी (१२०७ ते १२७३) हा तेराव्या शतकातला इराणमधील फार्सी भाषक विद्वान, तत्त्वज्ञ आणि कवी होता. त्याच्या आयुष्याचे सुरीने कापावेत तसे दोन वेगवेगळे तुकडे पडतात. पहिली पस्तीस वर्षे त्याने नेमस्त विद्वत्तेत आणि शिष्यांना धर्मज्ञान शिकवीत घालवली. १२४४ मध्ये शम्स-इ-तब्रीज नामक एक फिरस्ता दरवेश त्याच्या आयुष्यात वावटळीसारखा आला. तुर्कस्थानातील कोन्या येथे शम्स त्याला भेटला आणि तिथून पुढे रूमीच्या आयुष्याचा घाटच बदलून गेला. गुरू आणि शिष्य, देव आणि भक्त, आशिक आणि माशुक, ही सगळीच रूपे त्यांच्यापुरती एकमेकात एकवटली होती. म्हणतात, की पहिल्या भेटीत शम्सने रूमीला असा एक प्रश्न केला, की तो ऐकताच रूमी बेशुद्ध होऊन खाली कोसळला. शुद्धीवर आल्यावर त्याने त्याला उत्तरही दिले म्हणतात, पण तिथून पुढे ते दोघे अभिन्नजीवन झाले. रूमी आणि शम्स महिनोगणती बाकी कोणालाही न भेटता एकत्र राहत आणि एकमेकांशी प्रश्नोत्तरात रमत. ज्याला सूफी तत्त्वज्ञ 'सोहबत' म्हणतात, तशी त्या दोन जिवाशिवांची ही आत्मभेट घडत असे. अर्थात ही जगावेगळी 'सोहबत' जगाला मानवणारी नव्हती. रूमीच्या शिष्यांना दुर्लक्षिल्यासारखे वाटू लागले. त्यांचा मत्सर जागा झाला. ते लक्षात येताच एकदा शम्स परागंदा झाला. परंतु रूमीच्या निकराच्या बोलावण्यावरून तो परतला. या पुनर्भेटीच्या वेळी दोघेही एकमेकांच्या पाया पडले असे म्हणतात, त्यामुळे कोण आशिक आणि कोण माशुक ते इतरांना कळलेच नाही. परंतु पुन्हा या दोघांच्या जगावेगळ्या 'सोहबती' मुळे शम्स-इ-तब्रीजला एका सायंकाळी रूमीच्या घरातून हाक मारून बाहेर बोलावून नेऊन बहुधा मारण्यात आले. कोणी म्हणतात की रूमीच्या मुलाचा यात हात होता. कोणी म्हणतात, की शम्स त्या दिवशी जो बाहेर गेला, तो परत आलाच नाही. पण रूमीच्या अख्ख्या आयुष्यावर शम्सची सावली पडल्यामुळे त्याने वेडापिसा होऊन त्याचा बराच शोध घेतला, दमास्कसपर्यंत तो भटकत गेला आणि शेवटी तिथे त्याला साक्षात्कार झाला, की

"कशासाठी मी शोध घ्यावा? तो म्हणजे मीच तर आहे.
माझ्यातून तोच बोलतो आहे. मी मलाच शोधतो आहे."

काही असो, त्याच्या प्रयाणानंतर रूमीच्या हृदयातून कवितेचा धबधबाच जन्मास आला. रूमीच्या कवितातून, शम्स आणि खुदा या दोघांतही अभिन्नत्व आहे, स्वतः आणि तो यांतही अभिन्नत्वच आहे, जो मित्र तोच त्याचा गुरू आणि तोच त्याचा देव. असा आशय अभिव्यक्त झाला आहे. आपल्या हजारो कवितांना त्याने "दीवान-इ-शम्स-इ-तब्रीज" असेच नाव दिले. म्हणजे "काय म्या पामरें बोलावी उत्तरे, तया विश्वंभरें बोलविले" असे म्हणणाऱ्या संतांसारखा रूमीने त्या कविताकर्तृत्वाचा हार शम्सच्याच गळ्यात घातला.

शम्स शब्दाचा अर्थ सूर्य असाही आहे. एका कवितेत रूमी म्हणतो,

त्याच्यावाचूनची वर्षे कडवट,
त्याच्या सोबतची वर्षेही कडवटच
पण त्या दुसऱ्या कडवटपणाला
तळपत्या सूर्याची चव आहे.

याशिवाय जवळ जवळ पांच-एकशे कवितांमधून त्याने नीरवतेचा, निःशब्दतेचा (फार्सी शब्द 'खामुशी') उल्लेख केलेला आहे. प्रेम आणि निःशब्दता या दोन कल्पनांशी त्याची कविता गुंतलेली आहे. अलीकडेच त्याच्या अपरंपार कवितेचे फार्सीमधून इंग्रजीत अनेक काव्यात्म अनुवाद होऊ लागले आहेत आणि फार्सी येत नसल्यामुळे हाताशी लागलेल्या इंग्रजीच्या सोप्या कुबड्यांवर टेकून मी त्या कवितांचे भाव मराठी वाचकांपुढे ठेवण्याचा प्रयत्न करते आहे. अर्थात दोन आरशांमधून मूळ स्वरूपाची कल्पना घेण्याचा हा प्रकार आहे. प्रत्येक भाषांतरात मुळातल्या दारूला थोडीफार गळती लागतेच, पण ओंजळ घट्ट धरली तर तहान भागली नाही, तरी चव घेण्याइतपत तरी पिता येते.

शब्द आणि शांतता, ध्वनी आणि प्रतिध्वनी, हाकाटी आणि गाण्यांची धुन या शब्दसृष्टीबद्दलचे या सूफी कवीचे विचार एवढ्यापुरतेच माझ्या या अनुवादांचे क्षेत्र मर्यादित आहे. अनेक कवींना भाषा आणि निःशब्दता या जिव्हाळ्याच्या विषयावर भाष्य करावेसे वाटते आणि शब्दसृष्टीच्या ईश्वरांनी त्याबद्दल काय लिहिले आहे, हे निरखण्यात मला नेहमीच कुतूहल आहे. उत्कृष्ट कविता लिहूनही शब्दांचे तोकडेपण आणि भाषेचे लंगडेपण जाणवणारा सूफी संत रूमी आपल्याला परका वाटत नाही. आपल्या वेदान्त्याप्रमाणे ध्यानविषय, ध्याता आणि ध्यान या सर्वांचे तादात्म्य रूमीच्याही अनुभवाला आले आहे. कधी तो स्वतःला त्या नादाचा पडसाद म्हणतो, कधी त्याची चावी आपल्या आत फिरते, तेव्हा आपले कुलूप करकरते, असे म्हणतो. पण शब्दांच्या मर्यादेची त्याला विलक्षण तापदायक जाणीव आहे. ही भाषा म्हणजे नुसती मूठभर धूळ आहे, जी त्याच्या नुसत्या निःश्वासानेही सैरावैरा विखरून जाईल, असे रूमीला वाटते आणि त्याला हाक मारताना रूमी शब्दांवाचूनच्या भाषेचाच वापर करतो. "साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी बोलविता धनी वेगळाची" असे म्हणणाऱ्या तुकारामांशी रूमीच्या काही रुबायांचे नाते जुळते. कारण आपल्या सर्वच बोलांचे श्रेय तो त्या "नीरवतेच्या धन्याला" च देतो. पण अशा थोड्याशा साम्याबरोबरच रूमीच्या रुबायांतल्या काही प्रतिमा खास त्याच्याच आहेत. "विरहाच्या वाऱ्यात वाळलेल्या आपल्या त्वचेच्या कागदावर त्याने तप्त मुद्रा उमटवली आहे", म्हणणारा रूमी, देहोत्सर्गाला देश सोडून जाण्याचे रूपक लावणारा किंवा 'भिकाऱ्याच्या डबड्यात काही नाणी खडखडावीत, तसे या आपल्या देहात शब्द अडकून राहिले तर काय?' अशी चिंता करणारा रूमी हा अनोखाच वाटतो.

माझ्या प्रयत्नातून मुळातला रूमी कोणाला वाचावासा वाटला, तरी पुरे. त्याच्या या दोन कविता :

(१)

इतके बोल बोल बोललास की शब्दांपलीकडे पोचलास
**त्याला** प्रदक्षिणा घालता घालता 'तन्मय' होऊन गेलास
शब्दांच्या होड्या घेऊन इतक्या खोल पाण्यात गेलास
की ना शब्द राहिले, ना होड्या, ना तुझा तूही राहिलास

मी तुला हाकारले की आपल्यामध्ये पडदा येतो
तुझ्या दिव्यकांतीनेच तुझा चेहरा झाकून जातो
"तुझे ओठ" म्हणताच ते माझ्यापासून हिरावले जातात
खामोश ! शब्दांचा प्रेमाला गळफास बसतो.

सतत भीती वाटते मला की मरण नाही आले तर काय?
सतत माझा मीच राहिलो, **त्याच्यात** पोचलोच नाही तर काय?
भिकाऱ्याच्या डबड्यात काही नाणी खडखडावीत
तसे माझ्या या कलेवरात शब्द अडकून राहिले तर काय?

माझ्या हाडांमधून केल्या **त्याने** स्वर्गीय बासऱ्या
आणि शेकडो वर्षे विरहाच्या धगीने वाळवलेल्या
माझ्या त्वचेचा हा वाळकुडा भरभरीत कागद
ज्यावर **त्याने** पहा, उठवली आपली तप्तमुद्रा

(२)

नेति नेति म्हणतो, काय म्हणू मी **त्याला**?
त्या दिव्य प्रियाला, शब्द पुरेना ज्याला?
ही भाषा म्हणजे नुसती मूठभर धूळ
श्वासाने **त्याच्या** उडून जाईल वाया

काल जे आमच्या दोघांमध्ये घडले,
ते कसे लिहावे? काय कुणा सांगावे?
सोडीन खिळखिळा देश जेधवा मी हा,
सुरकुत्यात माझ्या कफनाच्या वाचावे.

मी पहाड; हा तव नादाचा पडसाद
मी चित्र; कुंचला तुझा रेखितो ज्यास
मी कुलूप; जे तुझी चावी फिरता वाजे,
हे शब्द कसे मग असतील माझे, सांग?





अनुक्रमणिका

हे रहस्य कैसे? नाद तुझा ये कानी,
मज सूर मिळे मग, देवकृपेची वाणी
यापूर्वी मजला झेललेस शतवार,
झेल आज फिरूनी, घडव नव्याने गाणी

ही तुझ्याचसाठी शब्दांवाचूनि भाषा
नीरवता इतरांपासुन राखी गुपिता,
मग तुलाच ऐकू येते माझी हाक
गर्दीत जरी मी उभा बाहतो तुजला

दुःख हे सोसतां अधिक झळकतो मी हा
विच्छिन्न होऊनी सुखात बुडतो मी हा
कधि धरेपरी मी शांत राहता मात्र
घनगर्जन माझे हादरते स्वर्गाला

हे अज्ञ सर्व जन, हे शत्रू आत्म्याचे
फोडून टाक तू घट पोकळ शब्दांचे
जे ज्ञानी त्यांच्या सहवासातच राही,
पाण्यात ठेवतां गंजुनि जाती आरसे.

पांघरो कितीही वस्त्रे, मी तुज दिसतो,
शब्द वा मुखाविण भाव तुला आकळतो,
शब्दांच्या लोभा पिउनि धुंद जग झाले,
तू नीरवतेचा धनी, दास तव मी तो.

Translated from Love's Fire : re–creations of Rumi by Andrew Harvey. 1988. Cape Poetry Paperbacks. Jonathan Cape Ltd. 32 Bedford Square, London WCIB 3 EL.

[दरवेशः मुस्लिम संन्याशांमधला एक पंथ]

**5346 Opal Place, Richmond, British Columbia, Canada V7C. 5B4.**







अनुक्रमणिका

# दोन ऑस्ट्रेलियन आदिम कविता

अनुवादक — **सुधाकर मराठे**

**एका मायबोलीसाठी शोकगीत**

युइनच्या जमातींची हरवल्येय बोली, डिरिंगान
मीही भरल्येय खेदानं, तुडुंब, अन रडत्येय, शोकगान
सुंदरसे ते शब्द, ग बाई, हळुवार उच्चारलेले
आता पडक्या भूतात तुटून फुटून भंगून विखरलेले
कोण जाणे कसे विसरलो इंग्रजी उपटल्यावर हिचं भान
आमची गोड गोडशी वाटणारी मायबोली, डिरिंगान.
आम्हालाच जर व्हायचंय संस्कृत तर दोष कुणाला देऊ
तुला हरवून बसलोत, माये माझ्या, ही लज्जा कुठं लपवू!

**मेरी ड्युरु, पृ. २८ इनसाईड ब्लॅक ऑस्ट्रेलिया.**

**आठवतंय?**

नदीकाठी जलमली
कमळाच्या पानावर हळूच विसावली
ही बाय — थकलेल्या डोळ्यांची
पानांच्या शेजारात, चिखल तुडवत, भरत्येय
आल्या टोपलीत कमळकंद, मासे, इवली कासवं, कळ्या
ही बाय — गात गात

शेकोटी भोवती, रातभर बसून
गणगोत — गरम कुपाट्यात भाजलेल्या
गोष्टी खात खात
बच्चे हसतायत, खिदळतायत
माय गात्येय गाणी
पोर थानाशी कवटाळून,
बाया सांगतायत कहाण्या, देतायत, घेतायत
गाणी, भुतात्म्यांची नावं, शिकवतायत साऱ्यांना
आपापल्या बोलीत.

आता मात्र नाही उरल्येय ती नदी — मोऽऽठ्ठा बंधारा
टोपली पण रिकामीच
आता सारं सुपरमार्केटात !
बाया बसल्यात मोठमोठ्ठ्या बंगल्यात
देत, घेत, आठवणी काढत
आयमाय रडत्येय, पोर चिकटलय भयभीत
बाया सांगतायत कहाण्या
नव्या नव्या गोष्टी, नवी नवी नावं
नव्याच भाषेत ...

**ईव्हा जॉन्सन, पृ. २५-२६ इनसाईड ब्लॅक ऑस्ट्रेलिया**

इंग्रजी विभाग, हैदराबाद विश्वविद्यालय, हैदराबाद - ५०० ०४६.



अनुक्रमणिका

# नाळ काही तुटेना

**– माधवी कोल्हटकर**

म्हणी आणि वाक्प्रचार हा त्या त्या भाषेचा आणि देशाचा सांस्कृतिक वारसा असतो. कित्येक काळाचे आणि कित्येक पिढ्यांचे शहाणपण त्यात साठवलेले असते. त्या ज्ञानाच्या छोटेखानी कुप्याच असतात असे म्हटले तरी चालेल. काही म्हणी श्रम, सहकार, धीर यांसारख्या गुणांचे महत्त्व सांगणाऱ्या वैश्विक महत्त्वाच्या असतात, तर काही मानवी स्वभावावर प्रकाश टाकणाऱ्या असतात. 'स्वैपाकिणीला ओली लाकडे' किंवा 'घरोघरी मातीच्या चुली' यांसारख्या काही म्हणी एकाच वेळी मानवी स्वभावाचे दिग्दर्शन तर करतातच पण त्याच वेळी त्या काही चालीरीती सांगणाऱ्याही असतात. हातच्या कांकणाला आरसा कशाला, नाकापेक्षा मोती जड, संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारी इ. म्हणी त्या त्या विशिष्ट समाजाबद्दल काही किमान माहिती असल्याशिवाय कळणेच शक्य नाही.

असेच काही वाक्प्रचार मला जपानी भाषेतही आढळून आले. त्या समाजाविषयी काही विशेष माहिती असल्याशिवाय त्यांचा अर्थ कळणे कठीण होते. मला ते कळले तेही मोठ्या गमतीदारपणे. माझ्याकडे माझी एक जपानी मैत्रीण रहायला आली होती. क्षणभरही घरात न ठरणाऱ्या मुलांबद्दल मी तिच्याजवळ तक्रार केली. त्यावर ती म्हणाली - अशा मुलांना जपानी भाषेत 'देबेसो' असे म्हणतात'. तिला जेव्हा मी याचा अर्थ विचारला तेव्हा ती म्हणाली, 'ज्याची बेंबी वाकडी आहे तो!' एवढासा हा शब्द देबेसो पण विचार करता करता मला वाटायला लागलं की एवढ्याशा तीन अक्षरी शब्दात जपानी संस्कृतीचं सारच साठवलेलं आहे.

'देबेसो' यात दोन शब्द आहेत. दे आणि हेसो. 'दे' हे 'देरू' या क्रियापदापासून बनलेले रूप. संधीमुळे देहेसोचं झालं देबेसो. देरू म्हणजे सोडणे, दूर जाणे, बाजूला जाणे. हेसो म्हणजे बेंबी.

बेंबीवरून मराठी भाषेतही म्हणी आहेत. त्या अशा –

बेंबीचा देठ पिळणे, बेंबीचा देठ पिळून दुखू लागणे, बेंबीच्या देठापासून कळवळा येणे- अतिशय कळवळा येणे, मनापासून माया असणे. बेंबीच्या देठापासून - अगदी अंतःकरणापासून खऱ्या भावनेने बेंबीच्या देठापासून जोर करून बोलणे, फार मोठ्याने, जोराने बोलणे. बेंबीचे उखळ होणे- लठ्ठ होणे बेंबीखालील केस ना केसात जमा, न शब्दात जमा - निरुपयोगी वस्तू.

पण या कुठल्या म्हणीशी देबेसो शब्दाचा वरचा अर्थ जुळून येत नाही. हेसो हा शब्द फक्त बेंबीच नव्हे, तर नाळ या विस्तारित अर्थाने पण वापरला जात असावा.





अनुक्रमणिका

संस्कृतमध्ये नाळ, नाडी आणि नाभी हे एका अर्थाने वापरले गेलेले दिसतात. सनाभि, सनाडी किंवा सनाभ्य म्हणजे एकच उगम असलेले. मग ते भाऊ असतील किंवा नातेवाईक असतील.

आणि यामुळेच जपानीमधल्या या शब्दाचा अर्थ काही वेगळा असावा असं मला वाटायला लागलं.

जपानमध्ये मूल जन्मले की त्याची नाळ कापल्यावर नाळेचा एक तुकडा त्याच्या आईला देतात. तो जन्मभर एका सुंदरशा पेटीत जपून ठेवतात. त्याला 'ताकारामोनो' म्हणजे खजिना असंच म्हणतात.

जन्माआधी मूल आईशी नाळेत जोडेलेलं असतंच, पण जन्मानंतरही मूल वाढतं ते आईजवळच जास्त. जपानमध्ये तर वडील जास्तीत जास्त वेळ धंद्याच्या किंवा या ना त्या निमित्ताने बाहेरच असतात. त्यामुळे लहान मुलाचा बराचसा वेळ आईबरोबरच जातो. पाठीवर मूल बांधून घरातील कामे तर आई करतेच पण पुढे एप्रन आणि पाठीवर 'ओशीन' या दूरदर्शन मालिकेप्रमाणे बांधलेले मूल अशी खरेदीला निघालेली बाई हे दृश्य अगदी नेहमीचंच. काही निरीक्षकांच्या मते तर बरीच मोठी होईपर्यंत मुले अशी पाठीला बांधलेली असल्याने त्यांच्या दोन पावलातील अंतरही इतर देशांतील मुलांपेक्षा जास्त झालेलं आढळतं.

पण आईबद्दलची ही जवळीक केवळ बालपणाशीच थांबत नाही. मुलं जसजशी मोठी होत जातात, तसतशी स्त्रीत्वाचा आदर्श म्हणजे आई, अशीच त्यांची दृढभावना होत जाते. यातूनच पुढे 'माऽऽझा कोन' म्हणजे 'मदर कॉम्प्लेक्स' या समस्येचा उदय होतो. मुलाचं लग्न झाल्यावरही त्याला आपली आई हेच सर्वस्व असतं. बायको त्यानंतर किंवा खरंतर बायको आणायची ती आपल्या आईचं (आणि वडलांचंही) करायला कुणीतरी हवं म्हणूनच. विशेषतः मोठ्या मुलाची तर ही जबाबदारीच. लग्नानंतर बायकोने कपडे करायचे ते त्याच्या आईसारखेच. स्वैंपाक करायचा तो ही आईच्या स्वैंपाकासारखाच. पूर्वी तर कित्येक वेळा नवरा बायकोंमधील वितुष्टापेक्षा या 'माऽऽझा कोन' मुळेच घटस्फोट व्हायचा. कित्येक मुलं आपल्या बायकोशी रमूच शकायची नाहीत. आज परिस्थिती थोडी थोडी पण बदलू लागली आहे. निदान या गोष्टीची जाणीव व्हायला लागली आहे. लग्नविषयक काही जाहिरातीत 'मुलावर आईवडलांची जबाबदारी नाही' हे एक जादा गुणविशेषण म्हणून लावलेलं असतं.

मुलगा आणि आईचे हे संबंध लक्षात घेतल्यावर 'देबेसो' याचा अर्थ लवकर लक्षात येतो. त्याचा अर्थ ज्याची बेंबी वाकडी आहे किंवा बाहेर आलेली आहे, असा होत नसून जो बेंबीपासून म्हणजे नाळेपासून, मुळापासून, आईपासून किंवा घरापासून दूर जाऊ बघतो, असा होईल म्हणजेच पर्यायाने उनाड.

ज्याला आपण रुसलाय, फुरंगटून बसलाय असं म्हणतो त्याला जपानीत वाक्प्रचार आहे, तोही असाच बेंबीपासून. तो आहे 'हेसोमागारी' म्हणजे बेंबी फिरवून किंवा वळवून बसला आहे. वरची परिस्थिती लक्षात घेतली की याचाही अर्थ कळायला सोपा होतो.

पण केवळ आई-मुलांचे संबंध या शब्दाने, या मार्गाने दाखवले जातात असे नाही. नोकर आणि मालक, शिक्षक आणि विद्यार्थी हे सबंधही अशाच स्वरूपाचे असतात. मालक हा आपल्याकडे काम करणाऱ्या सर्व लोकांना पाल्यासारखेच मानतो किंवा वागवतो. त्याच्या कल्याणाची, योगक्षेमाची सर्व जबाबदारी तो घेतो. त्याचे लग्न जमवणे हे ही मालक आपले कर्तव्य समजतो. वाढत्या औद्योगिकीकरणामुळे, विभक्त कुटुंबव्यवस्थेमुळे तसेच शहरीकरणामुळे कारखान्यातल्या कर्मचाऱ्यांची लग्ने जमणे कठीण व्हायला लागल्यावर मित्सुबिशी, मित्सुई इ. कारखान्यांनी आपल्या कर्मचारी वर्गाची लग्ने जुळविण्यासाठी वधू-वर सूचक संस्था काढल्या.

मध्ये टाटांची 'इस्पात भी हम बनाते है' ही जाहिरात खूप लोकप्रिय झाली होती. ती याच अर्थाच्या जपानी जाहिरातीवर बेतलेली होती. प्रसिद्ध मात्सुसिता कंपनीची 'आम्ही आधी माणूस घडवितो आणि मग इलेक्ट्रॉनिक यंत्र' अशी ती जाहिरात होती.

पण कारखानदारांनी अशी पालकत्वाची जबाबदारी घेतल्यावर कामगारांवरही तशीच कर्तव्ये येऊन पडतात. त्यांनाही कारखान्याशी तशीच बांधीलकी मानणे अपेक्षित असते. कारखाना हे घर समजून तिथे काम करणे अपेक्षित असते. मालक सांगेल ते, कामाच्या वेळी कुठलाही प्रतिवाद न करता ऐकायचे. वादावादी करायला, नापसंती व्यक्त करायला वेगळा वेळ दिलेला असतो. कारखान्यातल्या कामाच्या वेळानंतर मालक, कामगार यांच्या एकत्र मेजवान्या असतात.

बऱ्याच नियमितपणे, मुख्यतः पिणे हा त्यातला महत्त्वाचा कार्यक्रम. मग दिवसभराच्या कामासंबंधी जी काय नापसंती, चीड असेल ती त्या वेळी व्यक्त करायची. जशी घरच्या माणसांवर आरडून ओरडून, रुसून व्यक्त करतो तशीच. त्यावेळी समजा जाणतेपणातसुध्दा एखादा अधिकउणा शब्द बोलला गेला, तरी हा 'प्यालेला आहे' या सबबीखाली त्याला त्यावेळी सर्व गुन्हे माफ. यामुळे दुसऱ्या दिवशीच्या कामासाठी परत मोकळ्या मनाने सुरुवात करता येते.

जी गोष्ट कारखानदार-मालक यांची तीच पुढे वाढवून व्यक्ती आणि समूह यांची. हिंदू संस्कृती, धर्म, तत्त्वज्ञान हे सर्व व्यक्त्यधिष्ठित आहे. व्यक्तीच्या उन्नतीला, मुक्तीला त्यात महत्त्व आहे. मरणानंतर काय, जगाचे कोडे काय, यातलं परम तत्त्व काय इ. गोष्टींना हिंदू तत्त्वज्ञानात जास्त महत्त्व आहे. याउलट जपानमधील सारे तत्त्वज्ञान आणि धर्मसुद्धा समूहाधिष्ठित आहे, असे म्हणता येईल. भारतात जन्मला तो हीनयान बौद्धधर्म, पण जपानमध्ये पोचला , फोफावला तो महायान बौद्ध धर्म हेही याचेच द्योतक आहे. तिथे

धर्म आणि तत्त्वज्ञानाचाही सर्व भर व्यक्तीने समूहाची बांधीलकी जपण्यावर आहे. आज तिथल्या उच्चाधिकारावर असलेल्या व्यक्तींना प्रशिक्षणासाठी, (समाजाबरोबर राहण्याचे, हाताखालच्यांना बरोबर घेऊन जाण्याचे आणि सोशिकपणाचे प्रशिक्षण) काही दिवस तिथल्या प्रसिद्ध झेनपंथीय देवळात पाठवतात. समाजाशी असलेल्या या बांधीलकीमुळेच मग समाजाने ठरवून दिलेल्या रीतीरिवाजांच्या आणि पद्धतीच्या पलीकडे फारसे कुणी जात नाही. आजवर तरी जात नव्हते. याच वैशिष्ट्यामुळे तिथे सर्वांत भयंकर शिक्षा समजली जायची, ती म्हणजे 'मुराहाचिबु' म्हणजे वाळीत टाकण्याची. असे वाळीत टाकलेले लोक मग बहुतेक वेळा अपमानित होऊन गाव सोडून जात. पण दुसऱ्या गावातही ते उपरेच राहात. तिथल्या गावगाड्यात काहीशा आपल्यासारख्या बलुतेदारीत ते सामावले जाणे कठीण व्हायचे. बऱ्याच वेळा मग त्यांच्या वस्त्या गावाबाहेर असायच्या. त्यांना कामेही मग पोटापाण्यासाठी इतर समाजाने नाकारलेली अशीच मिळायची. (जपानमध्ये अस्पृश्यता निर्माण होण्याचे कदाचित हेही एक कारण असावे)

आजच्या औद्योगिकीकरणाच्या युगात वाळीत टाकणे ही घटना किंवा कृती गेली. पण त्यातली संकल्पना तशीच शिल्लक आहे. कुठल्याही समूहात काही वेगळेपणाने उठून दिसणारा माणूस असेल, तर 'वर आलेल्या खिळ्याला ठोकलंच पाहिजे' या न्यायाने त्याला 'निगुरेकुतु सुरू' ही वागणूक दिली जाते. म्हणजे त्याच्याकडे दुर्लक्ष करायचं - उपेक्षेने मारायचं. कंटाळून त्याने तसे वागणे तरी सोडले पाहिजे किंवा ती नोकरी किंवा तो समूह तरी. यामुळे आईवडील मुलांना मुख्यतः 'मेतात्सुनि नारानाइ योऽनि' म्हणजे फारसे कुणाच्या डोळ्यावर येणार नाही, अशा पद्धतीने वागायचा उपदेश करत असतात. या पार्श्वभूमीवर न ऐकणाऱ्या, हट्ट करणाऱ्या मुलाला 'कामिनारी वा हेसो ओ ताच्चाउ यो' म्हणजे 'गडगडणारे ढग तुझी बेंबी घेऊन जातील हो' ही भिती कसा पोटात गोळा उठवत असेल ते लक्षात येईल.

या संदर्भात आणखी एक वाक्प्रयोग आढळतो. शहरी भागातल्या सुशिक्षित समाजात तो त्या मानाने कमी आढळतो, पण रांगड्या समाजात बऱ्याच प्रमाणात वापरला जातो. एकमेकांना शिव्या देताना अर्थातच गंभीरात गंभीर आणि अर्वाच्य शिवी म्हणजे आईवरूनच. 'अनातानो काझ्रान वा हेसो गा वारुइ' म्हणजे शब्दशः 'तुझ्या आईची बेंबी वाईट'. तद्देशीयांशी यासंबधी चर्चा करताना काही लोकांच्या मते हे शारीरिक वर्णन असावे. पण तसे वाटत नाही. तुझ्या आईची बेंबी वाईट म्हणजे तुझ्या आईचे मूळ वाईट आहे किंवा तुझ्या आईची चालचलणूक, नीतिमत्ता चांगली नाही, ती नियमबाह्य वागते किंवा समाजाने घालून दिलेले नियम मुख्यतः शीलविषयक - पाळत नाही.

अर्थातच समाजाचे नीतीनियम पाळणे अणि बांधिलकी मानणे यांत व्यक्तिस्वातंत्र्याचा, व्यक्तीच्या वैयक्तिक उन्नतीचा संकोच होतही असेल पण त्याचबरोबर याचे ऐहिक जीवनात फायदेही निश्चित आहेत.

समाजाबरोबर राहायचे असल्याने अधिकारावरचा माणूस संबंधित सर्वांना विचारात आणि विश्वासात घेऊन निर्णय घेतो. प्रत्येक निर्णयावर आधी चर्चा होते. अगदी औद्योगिक विश्वातसुद्धा. तीन भारतीय एकत्र बसले तर त्यांची पाच मते असतील. पाच जपानी असले तरी त्यांचे एकमतच असते. समजा जर कोणाचे भिन्न मत असेल तर त्याला चर्चेत पटवून दिले जाते किंवा समजूत काढली जाते. एकदा निर्णय घेतल्यावर मात्र कोणीही मग तो मतातला असो की विरोधातला, त्या निर्णयाच्या विरूद्ध कृती करीत नाही; समाजाबरोबर रहायचे असल्याने करू धजत नाही. यातूनच गटाशी बांधीलकी वाढत जाते. एका संस्थेतली किंवा गटातली माणसे तुम्हाला बाहेरच्या गटात आपल्या गटाविषयी वाईट बोलताना आढळणार नाहीत. जे गटाचे, ते गावाचे, तेच शहराचे, तेच जिल्ह्याचे, तेच देशाचे. त्याचमुळे जपानमध्ये असताना नागोयातला माणूस तोक्योतल्या विद्वानाला काही कळत नाही असे म्हणेल पण देशाबाहेर पडल्यावर ते सारे जपानी. ते कुणाही जपान्याबद्दल वाईट बोलणार नाहीत.

मला वाटते या वृत्तीतच जपान्यांच्या प्रखर देशभक्तीचं मूळ आहे. जपानमध्ये कुठेही तुम्हाला झेंडावंदन, राष्ट्रगीत यांचे स्तोम दिसणार नाही. राष्ट्रगीत पटकन कुणाला सांगता येईल, असेही नाही. पण तरीही संख्याशास्त्रीय सर्वेक्षणाने हे सिद्ध झालेले आहे की जपानमधल्या लोकांची देशभक्ती ही जगातल्या कुठल्याही समूहापेक्षा जास्त आहे. तिथे लहानपणापासून मुलांना शिक्षण दिले जाते ते समाजऋण मानण्याचं, त्यांचे आदर्श पाळण्याचं, समाजाशी असलेल्या बांधीलकीचं, त्या दृष्टीने आवश्यक असलेल्या बारीक-सारीक रीतीरिवाजांचं. यामुळे तो समाज एकत्र रहायला तर मदत झालीच, शिवाय जपानची भौगोलिक परिस्थितीही याला मदत करणारी ठरली.

हा देश 'शिमागुनी' म्हणजे बेट असल्याने तिथे सहजासहजी प्रवेश मिळणे कठीण होतं किंवा घुसून आत आलेल्या माणसांना उपरे म्हणूनच रहावे लागत होते. पण दुसऱ्या महायुद्धानंतर परिस्थिती बदलू पाहते आहे. जपानचाही इतर देशांशी जास्त संबंध यायला लागलेला आहे. त्यातून होणारे काही बरे वाईट बदल आता उघडपणे दृष्टोत्पत्तीस यायलाही लागले आहेत आणि यामुळेच भविष्यकाळात तिथे काय घडते, याकडे साऱ्या जगाचेच डोळे लागले आहेत.

**८८५/३, भांडारकर रोड, पुणे - ४११ ००४.**



# चर्चासत्रांमध्ये संशोधनपर लेखांचे वाचन कसे करावे (आणि कसे करू नये)

— प्र. वि. पाठक

सर्वसाधारण अनुभव असा आहे की चर्चासत्रांमध्ये सत्रसंचालकांची वेळ संपल्याची घंटा वाजत राहते आणि खुर्ची घट्ट पकडून ठेवावी तसे लेख-वाचक हातात लेखाचे कागद घट्ट पकडून वाचतच राहतात. आपल्या वाचनाचा वेळ सीमित ठेवावा या सातत्याने दिलेल्या सूचनांनंतरही वर्षानुवर्षे तोच प्रकार व्यासपीठावर घडत राहतो. कधी कधी तर निबंध-वाचकाला अक्षरशः हाताने धरून बाजूला करावे लागते. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे चर्चासत्रात निबंध वाचताना आपल्यानंतरही काही संशोधक त्यांचे निबंध-लेख वाचण्यास आपल्या इतकेच उत्सुक आहेत याचे भान प्रत्येक निबंध-वाचकाने ठेवले पाहिजे.

चर्चासत्रात शोधनिबंध वाचणे हे एरवीच्या भाषण देण्यापेक्षा वेगळे आहे. नेहमीच्या ४०-५० मि. च्या भाषणात वक्त्याला विषय रीतसर सुरू करून भाषणाच्या दरम्यान विषयाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकायला अवसर असतो. काही महत्त्वाच्या मुद्यांवर खोलात जाऊन सविस्तर प्रतिपादन करता येते, पण चर्चासत्रांमधून संशोधनपर लेख वाचण्याचे प्रयोजनच वेगळे असते. आपल्या संशोधनातील महत्त्वाचे पैलू उपस्थित अभ्यासकांसमोर मांडणे हे त्याचे मुख्य प्रयोजन असते. तसेच चर्चासत्राच्या दरम्यान जमलेल्या अभ्यासक-संशोधकांबरोबर चर्चा करून विचारांची देवाणघेवाण व्हावी यासाठी चर्चासत्रे आयोजित केली जातात.

**लेख प्रसिद्धी व वाचन यातील महदंतर :**

शैक्षणिक आणि संशोधनपर व्यवसायांमध्ये गुंतलेल्यांनी सदैव नव्या ज्ञान-विज्ञानाच्या शोधात असावे. आपल्या संशोधनाचे फलित, संशोधनातून पुढे येणारी नवी माहिती, जुन्या माहितीची वर्गवारी, नव्या संकल्पनांचा पाठपुरावा इ. सहअभ्यासकांपुढे ठेवावे हीसुद्धा त्यांच्याकडून अपेक्षा असते. आपले संशोधन इतरांना माहिती व्हावे, त्या संशोधनाचा विस्तार व्हावा, संशोधन पारखले जावे या हेतूने अभ्यासक चर्चासत्रात भाग घेतात.

संशोधनपर लेख प्रकाशित करणे याला महत्त्व आहेच पण सहसंशोधकांपुढे आपले संशोधन मांडणे याला अधिक महत्त्व दिले पाहिजे. एखाद्या नियतकालिकातील लेख सर्वांनाच वाचायला मिळेल, वाचायला मिळणारे अभ्यासक तो तेवढाच लक्षपूर्वक वाचतील व त्यातील कमी-अधिक बाबींवर आपले मत प्रदर्शित करतील अशी शक्यता कमीच असते. असे असले तरी लेख प्रकाशित झाला तर त्याचे दोन फायदे निश्चित होतात. एक म्हणजे





अनुक्रमणिका

तो पुढे काही वर्षे येणाऱ्या संशोधकांसाठी उपलब्ध असतो. दुसरे म्हणजे चांगल्या नियतकालिकात प्रसिद्ध झाल्याने लेखनाला एक प्रकारे वजन प्राप्त होते.

संशोधनपर लेख चर्चासत्रात वाचण्याचे वेगळे फायदे आहेत. सर्वांत महत्त्वाचा फायदा म्हणजे एकाच वेळी अनेक श्रोत्यांना प्रत्यक्ष संपर्काद्वारे आपल्या संशोधनाचे सार सांगता येते. त्यातून मतमतांतरे लक्षात येऊ शकतात. संवाद साधतो. आपल्या विचारांच्या समांतर विचारधारा लक्षात येऊ शकतात आणि आपल्या विषयात रस घेणाऱ्या सहअभ्यासकांबरोबर प्रत्यक्ष चर्चेची संधी मिळते. हे सर्व उत्तम रीतीने घडून यावे असे वाटत असेल तर लेख-वाचन परिणामकारक झाले पाहिजे. संशोधकाने चर्चासत्रात लेख वाचण्याची संधी सोडता कामा नये पण त्याचबरोबर आपले लेख-वाचन परिणामकारक आणि पुढील अभ्यासाच्या दृष्टीने उपकारक कसे होईल हे ही बघण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**संशोधनपर लेखांची वैशिष्ट्ये :**

संशोधनपर लेख हा दीर्घकाल अभ्यास, मननाचा परिपाक असतो. तासन्‌तास वाचन, प्रयोगशाळा अथवा प्रायोगिक क्षेत्रात केलेली रात्रंदिवसांची मेहनत, लेखाच्या हस्तलिखितात पुनःपुनः फेरबदल करून लिहिण्यात खर्ची घातलेले श्रम या सर्वांचे फलित म्हणजे संशोधनपर लेख. नव्या-जुन्या संकल्पनांचा मेळ, लेखकाची कल्पनाशक्ती, अभ्यासाद्वारे प्रतिपादन करायचा सिद्धांत, प्रत्यक्षात मिळणाऱ्या निकालांवरून काढलेले निष्कर्ष या सर्वांचा उत्तम मेळ बसला की चांगला संशोधनपर लेख तयार होतो. या संशोधन प्रयत्नातून कधी कधी अफलातून कल्पना निष्पन्न होते. तिचा पाठपुरावा करण्यात एक आगळाच बौद्धिक आनंद असतो. ती कल्पना लेखाद्वारे प्रसृत करताना त्याचा पुन्हा अनुभव येतो.

असा सुंदर तयार झालेला लेख जर चर्चासत्रातील श्रोत्यांना भावण्याच्या पद्धतीने सांगितला गेला नाही तर सर्व श्रमांवर पाणी फिरल्यासारखे वाटते. संशोधनपर लेख वाचताना त्यातील महत्त्वाचे निष्कर्ष, नवी माहिती आणि लेखकाचे स्वतःचे त्यात योगदान हे सर्व ठसठशीतपणे श्रोत्यांपर्यंत पोहेचणे आवश्यक ठरते.

संशोधनपर लेख शिळा असू नये, एका ठिकाणी वाचलेला लेख पुन्हा पुन्हा निरनिराळ्या व्यासपीठांवर वाचला जाऊ नये, प्रत्येक लेखात काहीतरी नवी माहिती, नवे निष्कर्ष असावेत हे दंडक पाळले पाहिजेत.

**वेळेवरील बंधन :**

कुठलेही चर्चासत्र आयोजित करताना काही कार्यक्रम ठरलेले असतात. उद्‌घाटनाचा सोहळा, प्रमुख वक्ते, पाहुणे, ज्येष्ठ संशोधकांचे विस्तृत भाषण, आभार प्रदर्शन, आसपासच्या महत्त्वाच्या स्थळांना भेट इ. सर्वांना प्राधान्य मिळून उरलेल्या वेळात

संशोधकांनी आपले लेख वाचावेत अशी अपेक्षा असते. चर्चासत्राआधी बराच काळ पूर्वसूचना देऊनही वेळेवर न येणाऱ्या संशोधकांना काही ना काही करणाने डावलता न आल्याने त्यांचाही समावेश निबंध-वाचकांमध्ये करावा लागतो. या सर्वांचा परिपाक म्हणजे संशोधकाना स्वतःचे संशोधन मांडण्यासाठी प्रत्येकी १०-१५ मि.चाच अवधी मिळतो. त्या वेळातच १-२ प्रश्न विचारण्यासाठी त्याने वेळ उरविला पाहिजे अशीही आयोजकांची इच्छा असते.

हे सर्व पाहता १५-२० पानी लेख शब्दशः वाचणे अशक्यप्राय आहे. तो संक्षिप्त करून वाचायचा म्हटले तर तो इतका त्रोटक होईल की त्यातील प्राणच निघून जातात की काय याचे भय लेखकाला वाटत राहते. प्रत्यक्षात मात्र असे दिसते की लेख वाचायला येणारे लोक तो आपल्याला शब्दनूशब्द वाचावा लागणार आहे अशी तयारी करून येतात, हे चूक आहे. जितका अधिक वेळ संशोधक वाचन सुरू ठेवतो तितका वेळ श्रोत्यांची चुळबुळ वाढत राहते. फारच ताणले तर अस्वस्थ श्रोत्यांमुळे लेख-वाचनाचा विचका होतो. याशिवाय नंतरच्या संशोधक-वाचकांचा राग ओढवून घेतला जातो ते वेगळेच. केवळ आपण अमुक तमुक चर्चासत्रात आपला लेख वाचला एवढेच समाधान काय ते मिळते.

**लांबलेले वाचन :**

जर ठरवून केलेले ४०-५० मिनिटांचे भाषण नसेल तर लांबलेले लेख-वाचन कंटाळवाणे आणि नीरस ठरते. त्याची परिणामकारकता कमी होते. पसरट वाचनामुळे श्रोत्यांचा विषयातील रस कमी होतो हे वाचणाऱ्याला लक्षात येऊ लागले की तो घाईघाईने पाने उलटवून काही तरी असंबद्ध वाचू लागतो. वाचनाची सुरुवात, मध्य आणि शेवट यातील सूत्रबद्धता नाहीशी होते. संपविण्याच्या घाईत महत्त्वाचे मुद्दे सुटतात. फक्त वाचलेल्या लेखांच्या यादीत एकाची भर पडते.

खरे तर लेख वाचनानंतर काही प्रश्नोत्तरे झाली तर त्याची उपयुक्तता वाढते. लांबलेल्या वाचनाने प्रश्नोत्तरासाठी वेळच उरत नाही. सत्रसंचालकांची घंटी वाजते. श्रोत्यांनी त्यात लक्ष न घातल्याने सत्रानंतरच्या मोकळ्या वेळात कुणी येऊन शंका उपस्थित करेल, आपल्या नव्या कल्पनांना प्रतिसाद देईल, नवा सहकारी संशोधक मिळेल या गोष्टी घडत नाहीत व असे न होणे हा संशोधकाने मोठा तोटा मानायला पहिजे.

प्रत्यक्षात पाहिले तर आकाराने मोठा, जास्त पानांचा लेख म्हणजे त्यात काहीतरी मोठे संशोधन असणार असे नसते. त्यात बरेचदा विषयाशी संबद्ध नसलेले भारूड दुसऱ्या लेखकाची शब्दशः दिलेली अवतरणे आणि भोंगळ विचार असण्याचीच शक्यता दृष्टीस पडते.

कुठलीही विषयाला कलाटणी देणारी, नवे क्षितिज उघडे करणारी संकल्पना थोड्या शब्दांत सांगता येते. याचे सर्वांत उत्तम आणि अत्यंत समर्पक उदाहरण म्हणणे विज्ञान

महर्षी अल्बर्ट आईन्स्टाईन यांचे E=mc2 हे समीकरण आहे. पूर्वीच्या भौतिकशास्त्राचा चेहरामोहरा पार बदलवून टाकण्याचे सामर्थ्य, या समीकरणात होते. त्यांच्या सापेक्षतावादाचा सिद्धांत प्रतिपादन करणारा लेख छोटा होता.

साधारणपणे संशोधनपर लेखांचा ढाचाही ठरलेला आहे. त्यात प्रथम संशोधकाने जो प्रश्न निवडला त्याचे विवेचन असावे. त्याचे महत्त्व निर्देशित केलेले असावे. त्यानंतर त्या विषयाला धरून पूर्वी जे काही संशोधन झाले असेल त्याची सुसूत्र माहिती असावी. ती दिल्यावर संशोधकाने स्वतः काय संशोधन केले, कसे केले, त्याला काय नवी माहिती मिळाली, याची सविस्तर चर्चा असावी. त्याला नव्या निष्कर्षावर येण्यासाठी कोणता नवा विचार मांडावा लागला, त्यामागची सैद्धांतिक आणि तर्कशुद्ध विचारसरणी मांडलेली असावी. यानंतर मिळालेल्या पुराव्यांचे परिष्करण, निष्कर्ष इ. द्यावेत. लेखाच्या शेवटी ८-१० ओळींत त्याचा सारांश द्यावा.

**वाचन-पद्धती :**

चर्चासत्रात लेख उत्तम रीतीने वाचण्याची पद्धतीच आहे. जर वर दिल्याप्रमाणे लेखाची मांडणी केली असेल तर लेख वाचताना कुठल्या गोष्टींवर भर द्यायचा याचे भान आपोआपच येते. चर्चासत्रामधून लेख वाचायला मिळणारा १० मि. चा अवधी लक्षात घेता वेळेचा विनियोग खालीलप्रमाणे केल्यास आटोपशीपरणा येऊन वाचन परिणामकारक ठरते.

पहिली २ मि. संशोधनाच्या मुळाशी असलेला प्रश्न आणि त्याचे महत्त्व सांगण्यास द्यावीत.

पुढची २ मि. पूर्वी झालेले संशोधन, एक दोन ठळक संशोधक पूर्वसूरींचा नामनिर्देश करून सांगण्यास द्यावीत.

यानंतरची ४ मि. मुख्य संशोधनाचे विविध पैलू, एक दोन महत्त्वाच्या पुराव्यांचा निर्देश आणि संशोधकाचे स्वतःचे योगदान यावर भर देऊन सांगण्यासाठी वापरावीत.

शेवटच्या २ मिनिटांत सारांश देऊन पुन्हा एखाददुसऱ्या वाक्याने मुख्य विषयाचा आढावा घेऊन वाचन संपवावे.

जर लेख-वाचनात छायाचित्रे अथवा (Slides) चित्रफिती दाखवायच्या असतील तर प्रत्येक चित्रफितीसाठी ½ ते १ मि. वेळ ठेवावा. म्हणजे १० मिनिटांच्या वाचनात केवळ ५ ते ७ चित्रफितीच दाखविता येतील. हे लक्षात घेऊन त्याप्रमाणे महत्त्वाच्याच चित्रफिती दाखविण्यासाठी निवडाव्यात.

**महत्त्वाच्या सूचना :**

लेख वाचताना काही धोरणे पाळली तर लेख वाचनात जिवंतपणा येऊन श्रोत्यांशी संवाद साधला जातो. त्यासाठी काही गोष्टी अवश्य पाळाव्यात :

१) आपल्या लेखाचे अंतरंग वारंवार संहिता वाचून आत्मसात केलेले असावे.

२) लेख वाचताना सतत समोरच्या हस्तलिखिताकडे पाहत राहू नये. शब्दशः वाचण्याचा मोह टाळावा. अशा वेळी स्फुट टिपण हाताशी असणे मोठे सोयीस्कर ठरते.

३) बोलण्याच्या ओघात एखादा मुद्दा सुटल्याचे लक्षात आले तरी गडबडून जाऊ नये आणि पुन्हा मागे फिरू नये, पुढचे मुद्दे घेत जावे. सुटलेला मुद्दा शेवटी सारांश देताना उद्‌धृत करता येतो. मध्येच परत फिरल्याने सूत्र तुटून विस्कळीतपणा येतो.

४) समोरच्या काही श्रोत्यांबरोबर दृष्टिसंपर्क साधला आणि काही वाक्ये लक्ष देऊन ऐकणाऱ्या श्रोत्यांना संबोधून उच्चारली तर त्याचा चांगला परिणाम होतो. त्यातून आपोआपच बहुतांश श्रोत्यांबरोबर संवाद साधला जातो. नजर न हालविता सरळ समोर बघणे, अंतराळात बघणे. नजर श्रोत्यांवरून काढून आजूबाजूला बघणे याने श्रोत्यांचेही लक्ष विचलित होते.

५) फार घाईघाईने न बोलता जरा सावकाश बोलले तर कमी माहिती श्रोत्यांपर्यंत पोहोचेल असे वाटत असले तरी हळू सांगितलेली माहिती अधिक चांगली ग्रहण केली जाते. तेव्हा जास्त माहिती श्रोत्यांच्या डोक्यात कोंबावी हा उद्देश न ठेवता महत्त्वाची माहिती त्यांनी समजून घ्यावी असा उद्देश ठेवावा.

६) बोलताना एखाद-दुसऱ्या ठिकाणी हाताने निर्देश करून, मुद्दा ठामपणे मांडताना टेबलवर हात ठोकून जरा सांगितले की श्रोत्यांनाही त्याचे महत्त्व पटते. खूप हातवारे करत केलेल्या भाषणाने श्रोत्यांमध्ये गांभीर्य झिरपत नाही.

७) एखादा शब्द वारंवार बोलण्यात येत असेल तर तो कटाक्षाने टाळावा. नाहीतर श्रोते तो शब्द कितीवेळा आला याचीच मोजदाद करतात.

८) वाचतेवेळी भडक पोषाख असता कामा नये. (विशेषतः महिला वाचकांनी हे लक्षात ठेवावे).

वरील धोरणे पाळली तर लेख-वाचन परिणामकारक होतेच. शिवाय वेळेत संपल्याने चर्चा-संचालक प्रश्नोत्तरांना वाव देतात. श्रोत्यांपर्यंत संशोधनाचे सार पोहोचल्याने योग्य प्रकारचे प्रश्न विचारले जाऊन त्यांना समर्पक उत्तरे देता येतात.

स्वतःलाही संशोधन श्रोत्यांपर्यंत नेमके पोहचले याचे समाधान होते. अशा परिणामकारक वाचनाचे नंतर पूर्ण चर्चासत्रभर पडसाद उमटत राहतात. लेख वाचणाऱ्या संशोधकाच्या मंदिलात मानाचे पीस खोवले जाते. हा कुणालाही हवाहवासा वाटणारा अनुभव असतो.

**सारांश :**

लक्षात असू द्या की चर्चासत्रात लेख वाचणारे तुम्ही एकटेच नाही, तर इतरही त्याच संधीची वाट पाहात आहेत.

लेखाची ओळन् ओळ वाचण्याच्या भरीस पडू नये.

प्रत्येक मुद्दा सारांश रूपाने सांगताना संशोधनातील स्वतःच्या योगदानाच्या बाबतीत मात्र थोडे विस्ताराने व स्पष्ट करून सांगावे.

महत्त्वाचे मुद्दे थोड्या शब्दांत पण ठासून मांडले पाहिजेत.

चित्रफितींची संख्या ५-७ पर्यंतच मर्यादित ठेवावी आणि प्रत्येकातील माहितीसाठी ½ ते १ मि. द्यावा.

श्रोतृवर्गाबरोबर दृष्टिसंवाद साधावा आणि लेख-वाचनाच्या यशस्वितेचा तुरा खोवून चर्चासत्रातून परतावे.

**२०३, शांताभवन, साईनगर, वसई मार्ग, जि. ठाणे - ४०१ २०२.**



# प्रयोगजीवी कला आणि भाषा व्यवहार

**— रंगनाथ कुलकर्णी**

(चिं. वि. जोशी यांच्या जन्मशताब्दी वर्षात त्यांचे स्मरण करताना रंगनाथ कुलकर्णी आपल्या 'बहुरूपी' कारकिर्दीच्या डायरीमधील काही पानंच जणू आपल्यासमोर उलगडत आहेत. थोडा संक्षेप करून–)

मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या १९९२च्या वार्षिक संमेलनात चिमणरावाचा पहिला जाहीर प्रयोग केला तो मान्यवरांच्या पसंतीस उतरला. नंतर इतर प्रयोग झाले. प्रत्येक प्रयोग सुधारत, वाढवत राहिलो.

भायखळ्याच्या कामगार वस्तीत मात्र संपूर्ण प्रयोग सगळ्या प्रेक्षकांच्या डोक्यावरून गेला! चिं. वि. ज़ोशींचे त्यांनी काहीच वाचलेले नसणार!

काळ-वेळ सांस्कृतिक पूर्वपीठिका यांच्यामुळे विनोद आवडू शकतो, नावडू शकतो. प्रदेशानुसारही प्रतिसाद बदलतो असा अनुभव २५ वर्षांत ३००० कार्यक्रम करता करता मला आला. मुंबई-पुणे-नाशिक त्रिकोणात जो कार्यक्रम दोन तास चालतो तो मराठवाडा-विदर्भ भागात सव्वादोन-अडीच तासात चालवावा लागतो. एक उदाहरण सांगतो.

'गरीब बिचारे पुरुष' या एका यशस्वी कार्यक्रमाच्या उत्तरार्धातील हा भाग पहा : 'अशा या अफाट शक्तिशाली स्त्रीपुढं लग्नानंतर एकट्यादुकट्या पुरुषाचा निभाव कसा लागणार? (हशा) पांडव बेटे हुषार – (क्षणभर शांतता, मग मोठ्ठा हशा) हा झाला त्रिकोणातील प्रतिसाद. तसा तो अन्यत्र येतोच असे नाही, मग मूळ वेच्यासाठी 'गाईड' काढावंच लागतं आणि पुढील वाक्यं घालावी लागतात : 'म्हणून तर त्यांनी पाचजणांनी मिळून एकट्या द्रौपदीला 'घेराव' केला ! आणि मग कॉन्फिडन्स आल्यावर त्यांतल्या दोघांनी सेपरेट सेपरेट शादी केली – ॲडिशनल!' (हशा)

वास्तुस्थिती अशी असल्याने माझ्या यशस्वी ठरणाऱ्या प्रयोगाचं ३३ टक्के श्रेय मी प्रेक्षकांना देतो, ३३ टक्के लेखकाला आणि ३३ टक्के मला – फक्त एक टक्का प्राक्तन किंवा लकफॅक्टरला.

अहो, आपण छानपैकी श्रीखंड पुरीचा चौरस बेत करावा आणि पानावर बसलेल्यांनी गुलाबजाम नाहीत म्हणून नाक मुरडावं – असल्या माणसांना साष्टांग नमस्कार! जे उभं केलं आहे त्याचे त्याला नियम लावा.

**सी ३५ चिरंतन, शिवसृष्टी, कुर्ला पूर्व, मुंबई - ४०० ०२४**

**(मूळ प्रकाशन : 'तिसरा चिमणराव' साहित्यसूची (पुणे) जाने. १९९३, पृ. १७-२०)**



# 'संपूर्ण बाळकराम' बद्दल

**– वसुधा माने**

कित्येक वर्षांपासून 'बाळकराम' चे विनोदी लेखन वाचते आहे. जिवा-भावांच्या पुस्तक मित्रांपैकी ते अव्वल नंबरवर आहे. मध्ये बराच वेळ गेला, ते काही हातात आलं नाही. गेल्या महिन्यात वाचनालयात गेले तर समोरच्या टेबलावर 'संपूर्ण बाळकराम' इतर कुणी तिथं पोहोचण्याआधी मी घाईघाईने ते हस्तगत केले.

घरी येऊन ते स्वस्थपणे वाचावे म्हणून उघडले. त्याआधी त्याचे मुखपृष्ठ नजरेत भरले. बोहोल्यावर काळी, मान तिरकी, डोक्यात फूल, जाडजूड वगैरे गुणांनी युक्त ठकी दाखवली होती. मधोमध अंतरपाट होता, त्यावर बाळकरामाने अजरामर करून ठेवलेली ठकीच्या लग्नाची जाहिरात लिहिली होती. त्यात दोन मुली एकदम करणारास एक मुलगी इनाम देऊ केली होती. अंतरपाटाचे एक टोक.खुद्द बाळक्या ऊर्फ बाळकरामाने धरले आहे. त्याचा पोशाख त्याच्यांच शब्दात सांगायचे तर 'नव्या-जुन्याचा संगम करणारा' होता. जुन्या पगडीस दोन्ही बाजूंना बंद बांधून ती हॅट सारखी दिसेल असे केले होते. जुन्या बाजारातून पँट, तळवे नसलेले मोजे खरेदी केले होते. अंतरपाटाच्या दुसऱ्या टोकास एक भटजीबुवा आहेत व त्यांच्या शेजारी ठकीचे वडील तिंबूनाना. वर्णनामध्ये ते धष्टपुष्ट असून जुन्या पद्धीचा अंगरखा, धोतर वगैरे त्यांचा पोशाखा असावा असा माझा समज आहे. पण मुखपृष्ठावर जे तिंबूनानांचं चित्र आहे ते वेगळंच आहे. त्यांच्या डोकीवर भले मोठे पागोटे ठेवले आहे ते ठीकच आहे पण अंगातला पायाखाली येऊ पहाणारा अंगरखा पाद्र्यांचीच आठवण करून देतो.

मुखपृष्ठावरील चित्रांबाबत एवढे विस्ताराने लिहिण्याचे कारण म्हणजे हे 'संपूर्ण बाळकराम' १९७० साली छापले आहे. त्यातील मजकुराच्या आमच्या आकलनात व वास्तविकतेत किती फ़रक पडलेला आहे ते मुखपृष्ठापासून दिसायला सुरुवात होते.

या संकलनात गडकऱ्यांचे पूर्ण अपूर्ण सर्व विनोदी लेखन एकत्र केले असावे. 'असावे' म्हणायचे कारण, याला प्रस्तावना नाही. नाव जरी 'संपूर्ण बाळकराम' असले तरी खात्रीपूर्वक तसे कसे म्हणावे?

गडकऱ्यांच्या लेखणीला कोणताही विषय वर्ज्य नव्हता. स्वयंपाक घरातील गोष्टी पासून ते कवींचा कारखाना, नाटक कसे पहावे, पर्यंत जशी त्यांची विनोद लेखणी चालते तशीच 'सकाळचा अभ्यास' मध्ये मुलांच्या भांडणात मूळ शब्दांचे रूपांतर कसे होते ते ते अचूक दाखवतात.

१९९५ साली हे वाचताना दुहेरी मजा वाटते. एक त्या लेखनाचे अंगभूत गुण जे माझ्या वयाच्या म्हणजे साठीच्या वाचकाला अजून परके झाले नाहीत असे मी मानत होते, व दुसरे एवढ्या लांबून तेव्हाच्या लेखन शैलीतले जाणवणारे विशेष !

लांबून जाणवणारे विशेष प्रथम नोंदते. या लेखनात ठायी ठायी आपण आपल्याला भेटतो. लेखक आपले अस्तित्व मान्य करून आपल्याला 'प्रिय वाचक हो' अशी हाक मारतात. मग आपल्यालाही पुढचा मजकूर वाचायला उत्साह येतो. बायकी भाषा लिहिताना ते नवऱ्याचा 'तिकडची स्वारी' असाच उल्लेख करतात 'अमळ', 'बरीक' अशा सारखे हल्ली अजिबात न आढळणारे कितीतरी शब्द इथे भेटतात.

मात्र या लेखनातला विनोद माझ्या बरोबरच्या सर्वांना कळेल असे मला वाटत होते. त्याचा भ्रमनिरास माझ्या एका मैत्रिणीने केला. तिला मी या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवत होते. वाचता-वाचता मला सारखे हसू येत होते. मध्येच मला थांबवून माझी मैत्रीण म्हणाली, "एवढं कसलं हसू येतयं तुला? आणि किती लांब लांब वाक्यं ही !"

खरंच की ! अघळपघळ बोलणे, जगातला सगळा वेळ आपल्याच वाटणीला आहे अशा थाटात जगणे, या वृत्तीचे प्रतिबिंब साहित्यात पडले तर नवल काय ! ते वाचून त्याचा आस्वाद घ्यायलाही वेळ असायचा. हळू-हळू यांत्रिकीकरणाचा हपाटा आपल्यालाही बसला. आता रंमत गमत दिनक्रम चालेनासा झाला. घाई हा परवलीचा शब्द झाला, जलद चालणारे वाहन म्हणून जो बैलगाडीचा लौकिक होता तो विमानाला प्राप्त झाला. त्या प्रमाणात साहित्याचे रूपही बदलले. इतके की पन्नास-साठ वर्षांपूर्वीचे त्याचे रूप आम्हाला ओळखेनाच.

हे स्वतःच स्वतःला हसण्याचं तंत्र आपण साहेबाकडून हस्तगत केलं आहे. कारण अशा तऱ्हेच्या वाङ्मयाची परंपरा आपल्याकडे नाही.

गडकऱ्यांना मुळातच अतिशयोक्तीची हौस. विनोदी लेखनात तर तिला बागडण्यास मोठे अंगण मिळाले. ठकीचे रूप वर्णन हे त्याचे प्रमुख उदाहरण आहे. अशा वर्णनाच्या स्त्रीचं लग्न जुळणं हे कष्टदायकच ठरले असते, अगदी आजही. त्यात फरक पडेल असं वाटत नाही. स्त्री रूपाचं किंवा बेरूपाचं म्हणा असं वर्णन करण्यात आपला निर्दयपणा दिसून येतो याचं भान लेखकाला राहिलेलं दिसत नाही.

लांबच लांब वाक्ये, (आजकालच्या वाचकांना) थोड्या परिश्रमाने शोधावा लागणारा, बहुतांशी नर्म विनोद ही "संपूर्ण बाळकरामा" ची वैशिष्ट्ये सांगता येतील.

इंग्रजी साहित्याच्या प्रभावाने, त्यातील गद्यांचे अनेकविध प्रकार आले. मात्र बाज विनोदाचा असो की शास्त्रीय लेखनाचा ते समाजाला 'बोधपर' असले पाहिजे ही खास भारतीय मागणी त्या काळचा कोणीही लेखक टाळू शकलेला नाही.

**नीड, ७८ पंचवटी कॉलनी, तळेगाव-दाभाडे ४१० ५०६.**



**साद आणि प्रतिसाद**

# भाषिक व्यवहारातील सलणारे काटेकुटे

**— निशिगंध देशपांडे**

स. न.

'भाषा आणि जीवन'चा दिवाळी १९९३ चा अंक हाती आला. अंकाचे बहिरंग (व बऱ्याच प्रमाणात अंतरंग देखील) आकर्षक वाटले. मुखपृष्ठ तेवढे या पूर्वीच्या इतर अंकांच्या मानाने तसे साधेच जाणवले.

अंकातील सर्वच लेख वाचनीय आहेत. विशेषतः 'सल' हा मनोहर राईलकरांचा लेख खूपच जचला. मराठी वाटांवरचे हिंदी-इंग्रजीचे काटेकुटे सध्या जागेजागी खुपत असतात. हे काटेकुटे केवळ आपल्याला एकट्याला खुपत नसून इतर अनेकांना खुपताहेत व त्यामुळे कदाचित रस्ता साफसूफ होण्याची शक्यता आहे याची जाणीव झाली. इंग्रजी Times of India चा दर्जा खालावत जाऊन अशी परिस्थिती आली की, त्या पत्राची अहमदाबाद आवृत्ती (बडोद्याला हीच आवृत्ती मिळते) घरात येऊ देणे म्हणजे घरातील मंडळींचे इंग्रजी अधिक अशुद्ध होण्यास मदत करणे असे वाटू लागले.

आता तशीच वेळ मराठी पत्रांच्या बाबतीत येऊ घातली आहे. इतर भुरट्या पत्रांची बातच सोडा, पण सध्याची लोकसत्ता व महाराष्ट्र टाईम्स ही दोन आघाडीची पत्रे आपल्या मुंबई आवृत्तीमध्ये ज्या चुका करीत असतात (इतर गावांच्या आवृत्त्यांची गत याहूनही चांगली असेलही कदाचित पण शक्यता कमीच वाटते) त्या बघता मराठीचे भवितव्य कठीणच वाटते. महाराष्ट्राच्या राजधानीत, 'मराठी असे आमुची मायबोली' चे ऐवजी 'मराठी नसे आमुची मायबोली जरी आज ती राजभाषा असे' असे म्हणणारी मंडळीच मराठीचे भवितव्य ठरवणाऱ्या, घडवणाऱ्या उच्चपदी विराजमान झाली असली पाहिजेत असे वाटू लागले आहे.

आजच्या (१३-५-९४) म. टा. च्या पहिल्या पानावरील एका बातमीचे कात्रण सोबत पाठवीत आहे. इटालियन पंतप्रधानांच्या अधिकारग्रहणाचा कार्यक्रम देशाच्या अध्यक्षांच्या राजवाड्यावर झाला हे सांगणारे वृत्त पाहून त्या इमारतीच्या शिखरावर उभारलेल्या ध्वजाजवळ वगैरे उभे असलेल्या मंडळींचा फोटो सोबत दिसतो का ते शोधून पाहिले. पण 'प्रसंगावधानता' राखून (हे भाववाचक नाम दि. ७-५-९४ च्या म.टा.मधील दुसऱ्या वृत्तातले) उपसंपादकांनी ते चित्र गाळले असावे.

मूळ इंग्रजीचे भाषांतर करण्याची कामगिरी, मला वाटते, सारीच वर्तमान पत्रे, इंग्रजी विषय न घेता मॅट्रिक वगैरे पास झालेल्या मंडळीकडे देत असावीत. आजच्याच (१३-५-९४) म. टा. मधील पहिल्याच पानावर व्यंगचित्राचे सोबत पाठवलेले कात्रण पहा.

Falling in Line साठी 'रांगेत आलो नाही' असा शब्दप्रयोग केवळ असलीच एखादी व्यक्ती करू शकते.

वर्तमानपत्री भाषा बोलून चालून 'घाईतील साहित्या'ची (Literature in hurry) पण इतरत्र तरी काय वेगळा प्रकार आहे? खाली उद्धृत केलेला परिच्छेद पहा.

"परंतु, या भाषांचा भाषिक सीमाप्रदेश सोडल्यास अन्योन्यसंबंध आवश्यक तितका प्रभावी स्वरूपात निर्माण होत नाही. वैचारिक, भावनात्मक व सांस्कृतिक मूल्यांची देवघेव परंपरागत धर्म व इंग्लिश भाषा यांच्या द्वारेच राखला जात आहे. हिंदी, गुजराती, मराठी, बंगाली, पंजाबी, आसामी, उडिया, नेपाळी, काश्मिरी व उर्दू यांच्यामध्ये त्या इंडो-आर्यन भाषा असल्यामुळे बरेच सादृश्य आहे म्हणून त्यात शब्दांची व कल्पनांची देवघेव आपोआप जितकी होते त्यापेक्षा दक्षिणेकडील तेलगु, तामीळ, मल्याळम् व कानडी या द्रविडी भाषा व वर उल्लेखिलेल्या इंडो-आर्यन भाषा यांच्यामध्ये त्यामानाने फारच कमी देवघेव होते. ही परस्पर देवघेव विपुल प्रमाणात होणे आपल्या सांस्कृतिक प्रगतीचा वेग वाढवण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेच. परंतु त्याहीपेक्षा भारताची राष्ट्रीय एकात्मता दृढ व अभेद्य बनविण्याकरिता अधिक आवश्यक आहे".

छापील १० ओळींच्या या मजकूरात एकूण फक्त पाच वाक्ये आहेत. अन् गंमत म्हणजे प्रत्येक वाक्य क्लिष्ट तर आहेच पण वाक्यागणिक मराठी शब्दार्थांचे व व्याकरणाचे खून देखील पाडलेले आहेत. वाक्य क्रमांक तीन तर परिच्छेदाचा मुकुटमणी आहे. पूर्वी मॅट्रिकच्या परीक्षेत बाणभट्टाच्या कादंबरीतील एखादे प्रदीर्घ वाक्य देऊन त्याचा अन्वय लावून साध्या शब्दांत भाषांतर करायला सांगत असत. त्या तऱ्हेने हे वाक्य बी.ए.च्या मराठीच्या परीक्षेत पेपरात घालायला हरकत नाही. (किती जणांना ते जमेल हा प्रश्न अलाहिदा.)

हाच लेखक पुढील परिच्छेदात म्हणतो, "या करिता महत्त्वाचा उपाय म्हणजे प्रत्येक प्रादेशिक मातृभाषा बोलणाऱ्या लोकसमूहामध्ये लगतच्या किंवा दूरच्या भारतीय प्रदेशांच्या भाषा उत्तम रीतीने अवगत केलेले, त्यापैकी एक किंवा अनेक भाषा उत्कृष्ट रीतीने लिहू व बोलू शकणारे आणि त्याचप्रमाणे त्या त्या अन्य प्रदेशीय भाषांतील प्रथितयश लेखांचे, ग्रंथांचे व ग्रंथकारांचे साहित्य स्वतःच्या प्रादेशिक मातृभाषेत चांगल्या रीतीने भावार्थ न गमावता, भाषांतरित व रूपांतरित करण्यास समर्थ झालेले सुशिक्षित निर्माण होण्याची मोठी निकड आहे".

बोला आता ! किती ठेचा लागल्या? आणि हे कर्तृत्व कुणा ऐऱ्या गैऱ्या नथ्थू खैरेंचे नसून मराठी विश्वकोशाचे मुख्य संपादक, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे आहे. विश्वास बसत नसल्यास उर्दू-मराठी शब्दकोश 'द्वितीय आवृत्ती १९८९ च्या सुरुवातीसच छापलेले निवेदन पहा. २६ जानेवारी १९६८ ला मुंबईला, महाराष्ट्राच्या राजधानीत, सचिवालयात दस्तुरखुद्द लक्ष्मणशास्त्रींनी स्वतः किंवा स्वतःच्या हस्तकांकरवी हा मराठीचा

खून पाडला आहे. मराठी भाषेची पीछेहाट होण्यास अशा अनेक मान्यवरांचा हातभार फार जुन्या काळापासून लागलेला आहे.

मराठी भाषा मागे पडून इंग्रजीला महत्त्व येणार हे 'वेळीच' जाणून स्वतःच्या मुलांनाही इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालण्याची चतुराई दाखविणारे व त्याची जाहीर बढाई मारणारे गंगाधर गाडगीळ (एका मुंगीचे महाभारत), उर्दू-मराठी शब्दकोशातील उर्दू वर्णांचे लेखन आणि उच्चारण यांचा तक्ता व टीप फक्त इंग्रजीत लिहिणारे डॉ. गोरेकर, ती टीप इंग्रजीत छापण्यास 'मान्यता' देणारे महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, जागतिक मराठी परिषदेच्या पहिल्या अधिवेशनातील औद्योगिक परिसंवाद इंग्रजीत चालविण्यास (प्रेक्षकांतून विरोध होईपर्यंत) मान्यता देणारे डॉ. देवधर, कुणाकुणाची नावे घ्यायची! "माझा मराठाचि बोलु कवतुके' किंवा 'जैसी पुष्पामाजी पुष्पमोगरी' अशा तुरळक अवतरणांच्या पलीकडे यांचे मराठीप्रेम कितपत खरे मानायचे?

१९९२ साली श्री. अनिरुद्ध कुलकर्णी यांनी लिहिलेल्या 'इब्सेन' या पुस्तकातील काही वाक्ये पहा.

१) "इब्सेनच्या जन्माआधी १४ वर्षे नेपोलियनच्या युद्धाचा परिणाम म्हणून, अनेक वर्षे डॅनिश वर्चस्वाखाली असणारा हा देश स्विडिश राजाला देण्यात आला. (पार्श्वभूमी पृ. क्र. ३)

२) "१८४९ मध्ये जी. ए. लामर्स हा धर्मगुरू शिएनमधील 'पॅस्टर' झाला. विशेष म्हणजे त्याचा राज्य-चर्चला विरोध होता" (पार्श्वभूमी पृ. क्र. १३)

३) लार्स नील्सन हा अपोथेकरीकडे पाहणारा जरा वयस्क गृहस्थही त्यांच्या मैत्रीला उत्तेजन देणारा होता. (पृ. क्र. १५)

४) "याच्यावरून ब्रांदची व्यक्तिरेखा घेतली गेली. असे काहीजण मानतात. हा इब्सेनचा आयुष्याचा मित्र ठरला". (पृ. क्र. ३९)

मला स्वतःला वाटते की आमची मराठी लेखक मंडळी (किमान पक्षी उच्चभ्रू मराठी मंडळी) विचार इंग्रजीत करतात व त्यांचे मराठीत भाषांतर करून लिहितात. म्हणूनच अशा इंग्रजी काट्याकुट्यांनी भरलेल्या मार्गावर मराठी वाचकांना चालावे लागते.

जो समाज स्वतःच्या भाषेविषयी, भाषेच्या व्याकरणाविषयी जागरूक नसतो तो समाज नाश पावतो असे म्हणतात. 'मी मराठी भाषक, मराठी भाषक समाज टिकण्यात माझे व माझ्या मुलाबाळांचे हित आहे' याची जाणीव शिक्षित समाजाला व समाजातील तथाकथित वरच्या थरातील मंडळींना झाल्याखेरीज मराठीची ही उपेक्षा थांबणार नाही.

**लक्ष्मी, ११ विठ्ठल सोसायटी, नवापुरा, बडोदे ३९० ००१,**
**दूरध्वनी (०२६५) ४५३६६०.**



# मराठीतील भाषाविषयक लेखन – १९९४

('भाषा आणि जीवन' च्या वर्षारंभीच्या पहिल्या अंकात त्याआधीच्या वर्षात प्रसिद्ध झालेल्या भाषाविषयक लेखनाची सूची प्रसिद्ध करण्याची प्रथा सुरुवातीपासून आम्ही पाळत आलो आहोत. ही सूची एखाद दुसऱ्या व्यक्तीने केलेली असल्यामुळे ती परिपूर्ण असणे शक्य नाही. पण ती परिपूर्ण करण्यासाठी प्रयत्न मात्र केले जातात. या सूचीमध्ये काही लेखनाचा निर्देश झालेला नाही असे लक्षात येताच वाचकांनी जर त्या नोंदी आमच्याकडे पाठवल्या तर या सूचीची पुरवणी म्हणून आम्ही पुढील अंकात त्या जरूर प्रसिद्ध करू. तरी वाचकांनी अशा नोंदी जरूर पाठवाव्यात अशी त्यांना विनंती आहे. – **संपादक**)

**एडके सुनंदा** / 'प्राथमिक स्तरावरील १ ते ५ इयत्तांची मराठीची पाठ्यपुस्तके' / भाषा आणि जीवन, पुणे / १३:१ उन्हाळा १९९४ / पृ. ८.

**कानडे मु. श्री.** / 'कै. गुरुवर्य डॉ. शं. गो. तुळपुळे' / भाषा आणि जीवन, पुणे / १२:३ पावसाळा १९९४ / पृ. ३.

**कानिटकर यशवंत** / 'ग्राम्यतेतील सामर्थ्य?' (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन, पुणे / १२:४ दिवाळी १९९४ / पृ. ५७.

**काळे कल्याण** / 'लहान मुलांची भाषा' / पालकनीती, पुणे / दिवाळी अंक १९९४ / पृ. २७.

**काळे कल्याण** / ' स्त्रीवादी लेखन आणि भाषेतील अडसर' (संपादकीय) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. १.

**कुलकर्णी अनंतराव** / मराठी भाषा खऱ्या अर्थाने जगवायची असेल तर – / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे / जाने-मार्च १९९४. अंक २६८ / पृ. ४०.

**कुलकर्णी गो. म.** / 'मराठी आणि कन्नड या भाषांचे सामंजस्य अत्यंत आवश्यक' / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे / अंक २६९ एप्रिल-जून १९९४ / पृ. ५३.

**कुलकर्णी द. भि.** / 'विद्यमान मराठी : एक अनागर बोली' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. ४२.

**कुलकर्णी श्रीधर रंगनाथ** / 'दखनी भाषेची ध्वनि-व्यवस्था' / पंचधारा, हैदराबाद / ३७:३ ऑनोडि १९९४ / पृ. १.

**केळकर अशोक रा.** / 'ख्रिस्ती धर्मविषयक सामान्य शब्दावली' (परिभाषा सूची) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ५३.

**केळवकर सुप्रिया** / 'घरगुती भाषेसंबंधी' (ज्याची त्याची प्रचीती) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ४३.

**कोल्हटकर माधवी** / 'शब्द, कोश आणि प्रयोग' (भाषा निरीक्षण) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ४४.

**खडपेकर विनया** / 'बालभारती / कुमारभारती : एक अवलोकन' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. २०.

**गंधे विनायक** / " 'एकच प्याल्या' ची भाषा" / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. २२.

**गंधे विनायक** / 'एकच प्याल्या' तील विनोद' (महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी) / साहित्यसूची, पुणे / जून १९९४ / पृ. २.

**गुंडी नीलिमा** / 'बोलू तैसे लिहू' (भाषा शिक्षण) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. ५४.

**गोगटे मधुकर** / 'रोमन लिपी' / ललित, मुंबई / जानेवारी १९९४ / पृ. ७.

**घाटे वि. द.** / ' जिवंत मराठी' (पुनर्भेट) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. १६.

**जोगळेकर गं. ना.** / 'ज्ञानक्षेत्रातील अराजक' (संपादकीय) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. १.

**जोशी चंद्रहास** / मराठी भाषेतील वाक्प्रचार / मेहता प्रकाशन, पुणे / १९९४ / पृष्ठसंख्या ८७, मूल्य ४० रु.

**ठकार निशिकांत** / 'मराठी कवितांची हिंदी भाषांतरे' / प्रतिष्ठान, औरंगाबाद / मार्च-एप्रिल १९९४ / पृ. ४२.

**तावरे स्नेहल** (संपा.) / व्यावहारिक मराठी (या ग्रंथातील लेखक : दत्तात्रय पुंडे, गं. ना. जोगळेकर, एकनाथ पगार, कल्याण काळे, किरण गंगापूरकर, प्रसन्नकुमार अकलूजकर, चंद्रकांत भोंजाळ, विश्वास मेहेंदळे, निरंजन घाटे, न. ब. पाटील, देव विजया, लीला गोविलकर) / स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे / सप्टेंबर १९९४ / पृ. सं. १२८, मूल्य ५५ रु.

**तुळपुळे शं. गो.** / 'जेजुरीचा जर्मन वारकरी : डॉ. गुन्थर सोन्थायमर' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ४.

**तेलंग विजया** / " 'बडुवा' आणि 'गाऊ' : अर्थवेध " (शब्दकथा) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. ४६.

**दादेगावकर पद्माकर** / 'ग्रंथ परीक्षण' / परीक्षित ग्रंथ – परिमल शब्दकोश (मराठी-इंग्रजी-हिंदी–मुख्य संग्राहक : य. ए. धायगुडे, साहाय्यक, मा. गो. धायगुडे; परिमल प्रकाशन, खडकेश्वर, औरंगाबाद / पंचधारा, हैदराबाद / वर्ष ३७ : अं. १-२, एप्रिल-सप्टेंबर १९९४ / पृ. २२७.

**दाबके द. ना.** / 'मराठी व्याकरणाबद्दल सूचना' (वेचक-वेधक) / ललित, मुंबई / जुलै १९९४ / पृ. ४१.

**दामले प्रवीण** / "'ण' च्या निमित्ताने" (ज्याची त्याची प्रचीती) / भाषा आणि जीवन, पुणे १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ४४.

**दावतर वसंत** / मराठी शुद्धलेखन / लोकवाङ्मय गृह, मुंबई / १९९४ / पृ. सं. १०४ मूल्य १०० रु.

**दीक्षित श्रीनिवास** / 'नाही हो, माय मराठीचा अडसर नाही' (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ५०.

**देव विजया** / 'एटिकेट' (शब्द कथा) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ५१.

**देव विजया** / 'वक्ता दशसहस्रेषु' (ग्रंथ परीक्षण) / परीक्षित ग्रंथ – The business Guide to Effective speaking – by Jacqueline Dunckell & Elizabeth Parnham – Kogan Page Ltd. 1985 / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ६३.

**देव विजया** / 'संस्कृतीचे जतन' (संपादकीय) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. १.

**देशपांडे दिनकर खंडेराव** / 'ओवी ते लावणी' (ग्रंथपरीक्षण) / साहित्य सूची, पुणे / ग्रंथागमन विशेषांक, ऑगस्ट १९९४ / पृ. ४७.

**देशपांडे दिनकर खंडेराव** / 'नाटकात शब्द हा सर्वांत महत्त्वाचा' / रुची, मुंबई / जुलै १९९४ / पृ. १७.

**देशपांडे दिनकर खंडेराव** / 'मेघदूत' – अनुवाद : काही विचार / साहित्य सूची, पुणे / मार्च १९९४ / पृ. ३१.

**देशपांडे माधव** / 'संस्कृत आणि प्राकृत' / भाषिक व सामाजिक संबंध / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. ७.

**देशपांडे स. ह., गोडबोले मंगला** / 'भाषण' आणि 'व्याख्यान' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ४६.

**देशपांडे गौरी** / 'दोन लेखांवरील प्रतिक्रिया' (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. ५४.

**धनपलवार माणिक** / 'तंजावरच्या मराठी साहित्यातील काही तेलुगु, कन्नड शब्द' / अनुबंध, गुलबुर्गा / वर्ष १८ अंक १, एमेजू १९९४ अंक ६९ / पृ. १६.

**नणदीकर गो. स.** / 'ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत' (वेचक-वेधक) / ललित, मुंबई / एप्रिल १९९४ / ४४.

**निमकर सुहास** / 'भारताबद्दल दुरभिमान नको' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ५५.

**नेरूरकर द्वारकानाथ** / 'शब्द शब्द जपून बोल' / रुची, मुंबई / ऑगस्ट १९९४ / पृ. ९.

**पंडित माया** / 'एकोणिसाव्या शतकातील भाषांतर-संस्कृती : वासाहतिक युद्धातील रणनीती' / श्रीवाणी वर्ष १ : अंक ३ / जानेवारी १९९४ – विशेषांक : एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र व मराठी साहित्य / पृ. १२.

**पाध्ये कमल** / 'जीवन, भाषा, कला : एक गोची' (दखलपात्र) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ३७.

**बिनीवाले अविनाश** / जर्मन शिकू या / स्नेहल प्रकाशन, पुणे / १९९४ / पृ. सं. ३२८, मूल्य १७० रु.

**बुवा वि. आ.** / 'उच्चारांची दुरवस्था' (वेचक-वेधक) / ललित, मुंबई / एप्रिल १९९४ / पृ. ४६.

**बेलवलकर सुमन** / 'परभाषकांसाठी तयार केलेली मराठीची पाठ्यपुस्तके - इयत्ता ६, ७, ८' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ३६.

**बोधनकर प्र. रा.** / 'वैश्विक व्याकरण' (Universal Grammar) / शिक्षण-समीक्षा, नागपूर / वर्ष २८, अंक १-२ एमेजूजु १९९४ / पृ. ३३.

**भवाळकर तारा** / 'मूग गिळून .... केव्हापासून?' (वेचक-वेधक) / ललित, मुंबई / एप्रिल १९९४ / पृ. ४८.

**भागवत वा. बा.** / 'भाषेसंबंधी वेदातील काही विचार' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. ३.

**भागवत श्री. पु.** / 'वस्तुस्थितीचा स्वीकार' (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ५४.





अनुक्रमणिका

**भागवत श्री. पु.** / 'संकटग्रस्त मराठी' (पुनर्भेट) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. ३१.

**भृगुवार सुरेश** / गोविंदाग्रजांची शैली / साहित्य प्रसार केंद्र, नागपूर / १९९४ / पृ. सं. १५५, मूल्य ७० रु.

**भोसले द. ता.** / 'उच्च माध्यमिक स्तरावरील पाठ्यपुस्तके' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. ४५.

**मराठे मन्दाकिनी** / 'जेरी, पेरी' (शब्दकथा) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ४७.

**मालशे मिलिन्द** / 'भाषा-विज्ञान आणि साहित्य-समीक्षा' / अनुष्टुभ्, लासलगाव / जुलै-ऑगस्ट १९९४ / पृ. १४.

**माळवदे रंमण** / चला इंग्रजी बोलू या / मित्र प्रकाशन / मार्च १९९४ / पृ. सं. १४० मूल्य ३० रु.

**मुंडले आशा** / 'वापरातून जात चाललेंले शब्दप्रयोग' (संपादकीय) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. १.

**मुंबई विद्यापीठ :** मराठीचे अध्यासन / भाषा आणि साहित्य विभाग रौप्य महोत्सवी वर्ष (सन १९६९-१९९४) / स्मरणिका / मुंबई विद्यापीठ, मुंबई / १९९४.

**मोहिते शरदिनी** / 'एक नावाचा शोध' (जाता जाता) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. ५०.

**रथ विमल** / 'मिस्टर' (शब्दायन) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ४८.

**राईलकर मनोहर** / 'मराठीतील लांबलचक वाक्ये' (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. ५५.

**राईलकर मनोहर** / 'संख्या वाचन : एक नवीन दृष्टिकोन' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. ३.

**राईलकर मनोहर** / 'परिभाषा' / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. २२.

**राणे श. रा.** / 'डॉ. श्री. रं. कुलकर्णी यांनी दिलेली संहिता संपादनाची गुरुकिल्ली' (ग्रंथ परीक्षण) / परीक्षित ग्रंथ : प्राचीन मराठी हस्तलिखिते : संशोधन आणि संपादन,

ले. डॉ. श्री. रं. कुलकर्णी, प्रका. – का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था, धुळे / श्रीवाणी वर्ष २, अंक १ / ऑगस्ट १९९४.

**रामनवमीवाले मीरा** / शब्दकोडी / एक सृजन / अनुबंध, गुलबुर्गा / वर्ष १८, अंक ३, अंक क्र. ७१ ऑनोडि १९९४ / पृ. ५४.

**वडनप ना. रा.** / शब्दकरमणूक / मेहता प्रकाशन, पुणे / १९९४ / पृ. सं. ६१ मू. २५ रु.

**वडनप ना. रा.** / शब्द कसरत / मेहता प्रकाशन, पुणे / १९९४ / पृ. सं. ६१ मू. २५ रु.

**वडनप ना. रा.** / शब्द खेळ / मेहता प्रकाशन, पुणे / १९९४ / पृ. सं. ६० मू. २५ रु.

**सराफ रा सो.** / इंग्रजी कसे शिकवावे ? / सुरेश एजन्सी, पुणे / १९९४ / पृ. सं. १४४ मूल्य ६० रु.

**साधू अरुण** / 'मराठी भाषा, साहित्य आणि समाज' / रुची, मुंबई / मे-जून १९९४ पृ. ९.

**साधू अरुण** / 'सूटेबल बॉय' मराठीत आणताना / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. ३५.

**सामंत सत्त्वशीला** / 'देवनागरीतील जोडाक्षरांची मोडतोड' (ज्याची त्याची प्रचीती) / भाषा आणि जीवन, पुणे / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ४१.

**सावळापूरकर पां. कृ.** / शब्द, वाक्य आणि अर्थ / जीवन विकास, नागपूर / वर्ष ३८, अंक १०, ऑक्टोबर १९९४ / पृ. ४६८.

**सोवनी म. वि.** / शब्दगोष्टी भाग १ व २ / फुलराणी प्रकाशन / १९९४ / पृ. सं. प्रत्येकी ६० / मूल्य अनुक्रमे २५ रु. व २८ रु.

**क्षीरसागर गजानन** / 'अनुवाद आणि अनुवादक' / साहित्यसूची, पुणे / एप्रिल १९९४ / पृ. ३२.



# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

## नवलेखक अनुदान योजना

कठीण आर्थिक परिस्थितीतील नवलेखक / नवलेखिकांना उत्तेजन मिळावे म्हणून त्यांच्या काव्यसंग्रह, कथासंग्रह, कादंबरी, नाटक-एकांकिका (संग्रह), ललित गद्य व बालवाङ्मय या ललित वाङ्मय प्रकारातील प्रथम पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदान देण्याची "नवलेखक अनुदान योजना" महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्यावतीने कार्यान्वित करण्यात येत आहे. या योजनेखाली सन १९९५-९६ या चालू आर्थिक वर्षासाठी नवलेखक / लेखिका, कवी / कवयीत्रींकडून साहित्य मागविण्यात येत आहे. ज्यांचे कोणत्याही वाङ्मय प्रकारातील स्वलिखित / संपादित / अनुवादित एकही पुस्तक प्रकाशित झालेले नाही अशानाच या योजनेचा लाभ घेता येईल. या योजनेत पुस्तके पाठविताना पुढील गोष्टी लक्षात घ्याव्यात.

१) या योजनेखाली वर उल्लेख केल्याप्रमाणे फक्त प्रथम पुस्तकाच्याच प्रकाशनार्थ अनुदान देण्यात येईल.

२) या नवलेखक अनुदान योजनेत अनुदानासाठी सादर करावयाच्या अर्जासोबत संबंधित व्यक्तीने त्याच्या छायाचित्रासह राजपत्रित अधिकारी, महाविद्यालयाचे प्राचार्य किंवा प्राथमिक / माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक चे ओळख दर्शविणारे प्रमाणपत्र संस्थेच्या शिक्क्यासह सादर करणे आवश्यक आहे. हे ओळख प्रमाणपत्र आपल्या अर्जासोबत न पाठविल्यास अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

३) या योजनेत अर्ज करू इच्छिणाऱ्यांनी नोकरीत असल्यास तेथील सक्षम अधिकाऱ्याने प्रमाणित केलेला वार्षिक उत्पन्नाचा दाखला तसेच खाजगी व्यवसाय अथवा शेती करीत असल्यास सक्षम अधिकाऱ्याने प्रमाणित केलेला वार्षिक उत्पन्नाचा दाखला अर्जासोबत जोडणे आवश्यक आहे.

४) काव्यसंग्रह, नाटक / एकांकिका संग्रह, कादंबरी, कथासंग्रह, ललितगद्य, बालकुमार साहित्य या कोणत्याही प्रकारातील वाङ्मय असावे **आणि ते दिनांक १ ऑक्टोबर, १९९५ पर्यंत** मंडळाकडे पाठवावे. त्यानंतर पाठविलेले हस्तलिखित चालू आर्थिक वर्षासाठी विचारात न घेता ते पुढील वर्षात विचारात घेतले जाईल.

५) वैचारिक स्वरुपाचे कोणतेही लेखन या योजनेत विचारात घेतले जात नाही.

६) मंडळाकडे हस्तलिखित पाठवताना त्यात आपले नाव, पत्ता किंवा अन्य तऱ्हेने ओळख पटेल असा कोणताही मजकूर लिहू नये. जर असा मजकूर हस्तलिखितात कुठेही आढळल्यास हस्तलिखित विचारात घेतले जाणार नाही. तज्ज्ञ - परीक्षकांकडे हस्तलिखित अभिप्रायासाठी पाठवताना लेखकाचे / लेखिकेचे नाव, पत्ता वगैरेबद्दल मंडळ गोपनीयता राखते. मात्र मंडळास हस्तलिखित सादर करताना आपले नाव, पत्ता हस्तलिखिताचे शीर्षक, वाङ्मय प्रकार याबद्दलचा तपशील एका वेगळ्या कागदावर लिहून तो हस्तलिखितासोबत पाठवावा.

७) पुस्तकाची मुद्रणप्रत हस्तलिखित स्वरुपात असल्यास ती पानाच्या एकाच बाजूस व सुवाच्य अक्षरात लिहिलेली असावी. मुद्रणप्रत टंकलिखित, चक्रमुद्रित किंवा झेरॉक्स केलेली असल्यास, पानाच्या एकाच बाजूस व स्पष्ट वाचता येण्याजोगी असावी. तसेच कात्रेणे असल्यास, ती कागदावर एकाच बाजूस क्रमाने व्यवस्थित चिकटविलेली असावीत. हस्तलिखित अशुद्ध असल्यास व त्यातील मजकूर वाचता येण्याजोगा नसल्यास हस्तलिखिताचा विचार केला जाणार नाही.

८) मुद्रणप्रत मंडळास मिळाल्यानंतर त्याची पोच दिली जाईल व त्यानंतर योग्यवेळी अनुदानाबद्दल निर्णय कळविला जाईल. मंडळाकडे आलेली हस्तलिखिते तज्ज्ञ परीक्षकाकडे पाठविली जातात. त्यांचा अभिप्राय अनुकूल असला तरच अनुदान देण्याबाबत मंडळ निर्णय घेते. त्याबाबत निर्णय कळविला जाईपर्यंत निष्कारण पत्रव्यवहार करू नये. हा निर्णय एप्रिल अखेरपर्यंत कळविला जातो.

९) अनुदानास पात्र ठरलेल्या साहित्यास तज्ज्ञांच्या अभिप्रायानुसार काही फेरफार आवश्यक वाटल्यास ते करून स्वच्छ मुद्रणप्रत तयार करून देण्याची जबाबदारी संबंधित लेखक / लेखिकेची आहे. ही सुधारित प्रत मंडळाकडे आल्यानंतरच अनुदानासंबंधीचा अंतिम निर्णय घेण्यात येईल.

१०) अनुदानास अपात्र ठरलेली मुद्रणप्रत किंवा या योजनेच्या नियमात न बसणाऱ्या हस्तलिखिताची मुद्रणप्रत परत हवी असल्यास दोन महिन्यांच्या मुदतीत मंडळाच्या कार्यालयातून परत न्यावी लागेल. मंडळाच्या कार्यालयाने मुद्रणप्रत परत नेण्यासंबंधात पत्रव्यवहार करूनही संबंधितांनी सदर साहित्य विहित वेळेत न नेल्यास त्यांना त्याची जरूरी नाही असे समजून ते निकाली काढण्यात येईल व त्याबाबतीत कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही. मुद्रणप्रत रजिस्टर पोस्टाने हवी असल्यास आवश्यक त्या रकमेची पोस्टाची तिकिटे पाठवावी लागतील.

११) स्वीकृत साहित्याच्या संपादनाचे व पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनाचे सर्व अधिकार मंडळाकडे राहतील.

१२) मुद्रणप्रत दोन प्रतीत असावी व तिची एक प्रत मंडळाकडे पाठवून दुसरी प्रत संबंधिताने स्वतःकडे ठेवावी. मुद्रणप्रत गहाळ झाल्यास त्याची जबाबदारी मंडळावर राहणार नाही.

१३) साहित्य मंडळाच्या कार्यालयाकडे दिनांक १ ऑक्टोबर, १९९५ पर्यंत पाठवावे.

अनुदानासाठी नमुना अर्ज व माहितीपत्रक मागविणे तसेच हस्तलिखिते पाठविण्यासाठी पत्ता –

श्री. चंद्रकांत वडे
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
एन्सा हटमेंट "डी" ब्लॉक, आझाद मैदान,
महापालिका मार्ग, मुंबई - ४०० ००१.

## पैसे भरण्याबद्दल सूचना :

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डर कूपनवर किंवा चेक सोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी :

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ६० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.
- परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

## परिषदेची वर्गणी :

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला. तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त, आश्रयदात्यांसाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.

(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर :

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

अनुक्रमणिका

नोंदणी क्रमांक : 0-40048/83